


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

TOM & BAY/KOEL/M-4/64

# शेतकऱ्यांना मोठा अभिमान वाटणारीं एंजिनें !



## किर्लोस्कर

## डिझेल एंजिनें

शेतीसाठीं उत्कृष्ट

**एव्ही १ ५ हॉर्स पॉवर डिझेल एंजिनें**

- वाजवी किंमत
- विश्वसनीय
- चालविण्याच्या व सुस्थितींत ठेवण्याच्या दृष्टीनें किफायतशीर
- चालवायला सोपी
- बसवायला सुलभ
- बिनतक्रार वर्षानुवर्षे काम देणारीं



**किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड, पुणें - ३**

अनुक्रमणिका

भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

# दीपावली

साहित्य * कला * संस्कृति



गणराज्य दिन विशेषांक

वर्ष २१ वें

फेब्रुवारी १९६६

मूल्य १। रु.

## श्रेयनामावलि–

- **शास्त्री अभिवादन :** अठरा अध्यायांची आधुनिक गीता–**आदित्य**
  स्थिरावला आहे एक शांतिसैनिक–(कविता)–**प्रभाकर अत्रे**
- **लेख – ललित लेख :** नाटक कपनी ऽऽत मी – **गोपालकृष्ण भोबे** ● हैद्राबादची वारी – एक वारकरी ● भारत-पाक युद्ध – **वसंत फेणे**
- **उसळले हिमगिरिचे आव्हान : कु. सुधा नेरुरकर** ह्यांची हिमगाथा (कथा)
- **काव्यात्म प्रीति–नाट्य :** चित्रांगदा – **सौ. मोहिनी वर्दे**
- **विनोद :** चोरी होते, पण सांपडतच नाही (नेहमीचेच)–**तु. मो. साळी** ● माझा जुना (पण एव्हर फ्रेश) पत्र संग्रह – **माधव अत्रे,** (मिश्किल) किंचित् काव्ये – **कल्याण इनामदार**
- **तीन (चटका लावणाऱ्या) कथा :** अग्निदिव्य (प्रीति) – **सौ. सुनीता क्षीरसागर,** कासवाची पाठ– **सौ. छाया दातार** आणि जंटलमैन (हुरहूर) **सुरेश वेंगुर्लेकर** शिवाय

दीपमाला (सारस्वत), ऐसी अक्षरे (प्रा. वि. द. सत), पानपुरी (श. शि. पेंढारकर) व भरपूर व्यंगचित्रे.

[मुखपृष्ठ–ब्लॉक : लाला तुळसीराम देवीदयाळ इंडस्ट्रीयल ट्रेनिंग इन्स्टिटयुट, ठाणे यांच्या सौजन्याने]

दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay –4.



अनुक्रमणिका

# दीपावली

**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मंबई ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बॅंकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बॅंकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# नवा वारसा

**इतिहासाचा नवा वारसा**
**दिला प्रभुच्या नेत्याने**
**साकाराया स्वप्ने त्याची**
**करू प्रतिज्ञा निष्ठेने**

भारताच्या प्रजासत्ताकाचा आज सोळावा वर्धापन दिन ! आमचे मंगल-निधान ! आधुनिक भारतांत सशस्त्र क्रांतिकारकांपासून ते निःशस्त्र सैनिकांपर्यंत अनेक ज्ञात आणि अज्ञात माणसांनीं फांशीपासून अंदमानापर्यंत आणि मंडालेपासून साबरमतीपर्यंत भोगलेल्या देहदंडाचे सुफलित ! कोटयवधींच्या कष्टातून, घामातून, रक्तातून आणि त्यागातून उभ्या राहिलेल्या एका श्रेष्ठ लोकशाहीचा वाढदिवस–अर्थांतच आनंदाचा, अभिमानाचा, गौरवाचाहि ! हा गौरव करीत असतांना आम्हीं व्यक्ती व्यक्तीतल्या 'व्यक्तित्वाचा' म्हणजेच 'मीत्वाचा' जयजयकार करतो असें आम्हांस वाटते. कारण लोकशाही व्यक्ति-व्यक्तीतल्या 'मी' ला मानते. तिचें अस्तित्व व तिची साधना हा तर लोकशाहीचा मूलभूत आधार मानला जातो. मी 'मी' आहे आणि मला स्वतःला 'मी' म्हणण्याचा अधिकार आहे ही जाणीव म्हणजे लोकशाहीची जाणीव ! 'मी' चा 'मी'ने आदर करणे म्हणजे लोकशाही समजणे. 'मी'ने 'मी'ला समजून घेणे. सहकार्य देणे. त्याला फुलूं देणे. विकसूं देणे. आणि चुकाही करूं देणे याचा अर्थ लोकशाही समजणे. भारताने सोळा वर्षांपूर्वी ह्या 'मी'चा जयजयकार करीत एक महान् प्रयोग ह्या खंडप्राय देशांत सुरूं केला आहे. आणि जगांतल्या असंख्य 'मी'ना मानून तो आपली वाटचाल करतो आहे. वैयक्तिक 'मी'ला ज्याप्रमाणे अनेक संघर्षातून जावे लागते; ऊन पावसाळे पहावे लागतात त्याचप्रमाणे ह्या प्रयोगालाही पहावे लागले आहेत. गेले वर्ष ही तर त्या प्रयोगाची महान् कसोटीच होती. ह्यातला 'मी' किती प्रगत आहे, त्यागी आहे, सोशिक आहे, कसोटयांना तयार आहे ह्याची सत्वपरीक्षा गेल्या वर्षाने जणुं पाहिली. आणि आपल्या देशांतल्या असंख्य प्रगत 'मी'नी ही कसोटी यशस्वितेने दिली आहे. आम्ही केवळ वयाने वाढलो नाही तर 'मी'त्वांत दडलेल्या फार मोठ्या अस्मितेचे आम्ही वारसदार झालो आहोत. गेल्या वर्षांत आम्ही 'आम्ही' आहोत. आणि 'आम्ही'ला कांही कणा आहे. स्वत्व आहे. तेज आहे ही एक नवी जाणीव झाली आहे. भारताच्या आधुनिक इतिहासाने ह्या प्रजासत्ताकाच्या नव्या यशाची दुंदुभी जणुं गेल्या वर्षाच्या साक्षीने पिटली आहे. आम्ही सूज्ञ आहोत. विकसित आहोत. प्रगतीचे द्रष्टेपण पाहण्याची ताकद आमच्या अंगीं आहे. हेच जणुं आम्ही जगाला पटवून दिले आहे. छाती ताठ करून आम्ही प्रजासत्ताकाचा सोळावा वाढदिवस साजरा करीत आहोत. भारतीय लोकशाहीचा वर्धिष्णु 'मी' आतां सोळाव्या वर्षांत पदार्पण करीत आहे.

पण........

त्याचा आजचा आनंद निर्भेळ नाही. सुखदुःख मिश्रित आहे. एकीकडे जयजयकारासाठी त्याचा कंठ आसुसला आहे तर एकीकडे दिवंगत नेत्याच्या स्मृतींनी कंठ दाटूनही येतो आहे. अवघ्या वर्षा दीडवर्षात त्या नेत्याने एक तेजस्वी वारसा दिला आहे–तेजाचा ! गौरव करणारे, तेज समजून घणारे, मनही तेजस्वीच असावे लागते. शास्त्रीजींनी दिलेला तेजस्वी वारसा सांभाळण्यासाठीं पुन्हा तुम्ही आम्ही तेजाची उपासना करण्याचीच प्रतिज्ञा केली पाहिजे.

कारण तो वारसा––

अंधःकाराकडून प्रकाशाकडे, अज्ञानाकडून ज्ञानाकडे आणि मृत्यूकडून अमृतमयतेकडे घेऊन जाणारा आहे.

—संपादक

२६ जानेवारी १९६६.



# स्थिरावला आहे शांतिसैनिक

शांतिवनातील शांतिकुंजात
स्थिरावला आहे एक शांति सैनिक
प्राण देऊन स्वतःचे ज्याने
राखले आहेत असंख्यांचे प्राण.
प्राणच नव्हेत तर राखली शान
देऊन स्वतःची मान
सोसून दारिद्र्य आणि अपमान
उभा केला आहे देश महान.
जळून गेले काजळी कोपरे
संपले सुस्कारे, सरली निराशा
मनात स्फुरली आशा–जिगीषा
त्यातून घडला नवा भारत.
ज्याने दिली टक्कर
काळावर केली मात
पचवले हलाहल, वर्षली सुधा
स्वाभिमानाची, तेजाची, अस्मितेची.
त्या अस्मितेची साधना करताना
तपस्वी थकला नाही, मन गातच राहिले
गीता—शांतीची, मानवतेची
पण——
पिचले शरीर,
केला असहकार
आणि म्हणून
आता——
शांतिवनातील शांतिकुंजात
पहुडला आहे एक शांतिसैनिक

—प्रभाकर [illegible]







अनुक्रमणिका

# अठरा अध्यायांची आधुनिक गीता



जग जिंकाया 'लाल' चालला

**'विष्णुदास'** लाल-बहाद्दुर शास्त्री गेले.

आधुनिक भारताचा कायाकल्प घडविणारा महापुरुष काळाने टिपून नेला. समरांगणावर तेजस्वी 'गीता' सांगून, अर्जुनाच्या मनातले भ्रम नाहीसे करून त्याला युद्धप्रवण करणारा आधुनिक श्रीकृष्ण, पराई पीड जाणणारा वैष्णव, शस्त्र आणि शास्त्र यांच्या सीमा ओळखणारा आधुनिक शास्त्री, सच्चा सेवक, त्यागी देशभक्त, जान गमावूनही देशाची शान राखणारा मातेचा लाडला लाल-बहाद्दुर आतां काळाच्या पडद्यात निघून गेला आहे. एका नव्या, तेजस्वी, पराक्रमी, अस्मितायुक्त पर्वाची समाप्ति झाली आहे. फार अल्प अशा काळांत ते तेजस्वी पर्व समाप्त झाले आहे. ही आधुनिक गीताही श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितलेल्या पूर्वीच्या गीतेप्रमाणेंच अठरा अध्यायांचीच आहे. त्या गीतेप्रमाणेच हीही गीता समरांगणावरच सांगितली गेली आहे. दोघींनीही 'कर्मयोग'च सांगितला आहे. दोघीचाही संदेश 'युद्धयस्व' असाच आहे. दोन्ही 'गीतां'च्या जन्माची पार्श्वभूमी समान आहे. **'संदेह नाश'** हाच दोन्हींचा जीवित हेतु आहे. भाऊ, चुलते, भाचे, मामे, चुलत भाऊ गुरुजन, मित्र यांना समोर पाहिल्यावर अर्जुनाला असाच संभ्रम पडला होता. ह्यांना जिंकून, ह्यांना मारून, ह्यांच्याशीं वैर करून मिळणारे राज्य आम्हांला नको असे अर्जुन म्हणूं लागला. त्याने गांडीव फेकून दिले. किंकर्तव्यमूढ तो झाला. मग अवतरली गीता ! तिने सांगितला युगधर्म ! मग घडले महाभारत. त्यांत सतींच्या अपमानांचा घेतला गेला प्रतिशोध ! अन्यायाला मिळाली एक झणझणीत चपराक. सत्य विजयी झाले. त्याला शान प्राप्त झाली. मान मिळाला. शकुनीच्या कपट नीतीला मिळाली मूठमाती आणि धर्म–द्यूतांत द्रौपदीसह सर्वस्व गमावून बसलेला धर्म–विजयी झाला. इंद्रप्रस्थाचा राजा झाला.

पुन्हां इंद्रप्रस्थाला तेच 'महाभारत' घडले. **'पंडितजींनंतर कोण'** ह्या वर्षानुवर्षे घोळविल्या गेलेल्या प्रश्नाला पंडितजींनीच उत्तर दिले. ते उत्तर कांहींसे आकस्मिक होते. आश्चर्यजनकही होते. पण जगाच्या रंगभूमीवर कधी कधी किमया घडते. जे नाटक चालेल की नाही अशी भीति व्यक्त केली जाते ते 'विक्रमी' ठरते. त्याचा जयजयकार होतो. ते 'इतिहास' घडवून जातें. **'पंडितजीनंतर शास्त्रीजी'** हे उत्तर असेच अनपेक्षित होते. अनेक लहान मोठी 'प्यादी' पटावर 'हयात' होती. त्यांत कांही राजे होते. कांहीं वजीर होते. हत्ती घोडेही होते. पंडितजींचे 'दान' आपल्या बाजूनेंच पडणार म्हणून त्यांनी खात्रीही बाळगली होती. पण पंडितजींनी दान टाकलेच नाहीं. त्यांनी नवाच पट मांडला आणि फांसे शास्त्रीजींच्या हाती दिले आणि भारताच्या रंगभूमीवरून त्यांनी निर्गमन केले. नवा डाव सुरू झाला. पंडितजींनी फांसे दिले होते. कांही 'वारसा' दिला होता. कानगोष्टीही केल्या होत्या. त्यांनी विश्वास टाकला होता. कसोटी शास्त्रीजींची होती. सतीचे ते वाण होते. जगांतल्या एका मोठ्या लोकशाहीचे संचालन करण्याचे दायित्व शिरावर आले होते. पण आधुनिक गीता सांगणारा श्रीकृष्ण रणांगणावर उभा ठाकला होता. त्याने चौफेर नजर टाकली. अंदाज घेतला. आणि सारथ्य सुरू केले.






ते सारथ्य होते अर्जुनाचे! भांबावलेल्या, बावरलेल्या, किंकर्तव्यमूढ झालेल्या अर्जुनाचे !!

शास्त्रीजींच्या नेतृत्वात अनेक नवे व निर्णायक गुण होते. त्यांच्या नेतृत्वातला पहिला गुण म्हणजे घोळ न घालण्याचा! शास्त्रीजी जसे शांत होते तसेच ते खंबीरही होते. प्रामाणिकपणा व खंबीरता हा त्यांचा स्थायीभाव होता. अठरा महिन्यांतल्या ह्या आधुनिक गीतेत कितीतरी महत्त्वपूर्ण विचार येऊन जातात. प्रतापसिंग कैरों, बक्षी गुलाम महंमद, पटनाईक, वीरेन मित्रा, अलिकडचे टी. टी. के. प्रकरण ह्यांत शास्त्रीजींच्या व्यक्तित्वातले वेगळेपण प्रकर्षाने जाणवले. ह्या सर्व प्रकरणी त्यांची वृत्ती खंबीरतेची होती. **"मी कुणाला तरी जबाबदार आहे. त्यांचा विश्वास हा तर माझा आधार आहे"** ही वृत्ति लोकशाहीच्या नेत्याजवळ असावी लागते. शास्त्रीजींजवळ ती अखेरपर्यंत होती. अगदीं ताश्कंद येथील करार केल्यानंतरही शास्त्रीजींना चिंता होती ती भारतीय जनता व लोकनेत्यांच्या प्रतिक्रियेची! टाईम्स ऑफ इंडियाचे खास प्रतिनिधि जी. के. रेड्डी यांनी ताश्कंदहून पाठविलेले एक वृत्त प्रसिद्ध झाले आहे त्यांत ते म्हणतात. "विवाद्य प्रश्न सोडविण्यासाठी बळाचा वापर करावयाचा नाही या गोष्टीला पाकिस्तानने आडवळणाने तरी मान्यता द्यावी म्हणून आपले सैन्य ५ च ऑगस्टच्या स्थितीपर्यंत मागे घेण्याची जी तयारी आपण दाखविली त्याची भारतीय जनता आणि नेते यांच्यावर कशा प्रकारची प्रतिक्रिया होईल यासंबंधी शास्त्रीजी अतिशय चिंताग्रस्त होते. त्या करारावर सह्या झाल्यावर भारतीय पत्रकारांच्या बैठकीत, हा करार परिणामी कसा हितकारक ठरणार आहे हे पत्रकारांच्या मनावर ठसविण्यासाठी त्यांची जी धडपड दिसून आली तीवरूनच आणि भारतात या कराराची काय प्रतिक्रिया झाली ते जाणून घेण्यासाठीं सायंकाळी त्यांनी



अमुचा राम राम घ्यावा

खास दूरध्वनी केला त्यावरून या कराराचे त्यांच्या मनावर किती असह्य दडपण होते हे अगदी स्पष्ट होते."

आणखीही अशी एक वार्ता प्रसिद्ध झाली आहे ती अशी की, दुसऱ्या दिवशीची सर्व वृत्तपत्रे (भारतीय) त्यांनी काबूलला मागविली होती. ह्यामागची भावना 'जनमत' ह्या गोष्टीला ते किती मानीत होते ह्याची साक्ष देते. राज्यशकट हातीं घेतल्यावर त्यांनी कैरों, पटनाईक, मित्रांचा घोळ घातला नाही. टी. टी. के. प्रकरणी त्यांनी केलेले वर्तनही त्यांची कीर्ति वाढविणारे ठरले आहे. मी कितीही मोठा असलो तरी मीही माणूस आहे. स्खलनशील आहे. वैयक्तिक मैत्रीपेक्षाही देश मोठा, शासन मोठे, शासनाचा गौरव मोठा ही त्यांची भूमिका होती. त्याचा योग्य परिणाम होत नाहीं असें पाहताच ताश्कंदच्या घाईतही त्यांनी टी. टी. कें. चे त्यागपत्र मान्य केले व सचीन चौधरींची नियुक्तीही करून टाकली. मुंदडा प्रकरणानंतर पंडितजींनीं न्यायमूर्तींवर जे ताशेरे झाडले वा श्यामाप्रसाद मुखर्जींच्या मृत्यूच्या कारणांची चौकशी व्हावी म्हणून त्यांच्या मातेने केलेल्या मागणीला नेहरूंनी जी उत्तरे दिली ती ह्या संदर्भात जरूर आठवावीत. शास्त्रीजींनी घेतलेली 'नम्र' भूमिका ते किती 'मोठे' होते हे सिद्ध करून गेली आहे.

शास्त्रीजींच्या राजवटीतली दुसरी व लोकशाहीशी सर्वस्वी सुसंगत गोष्ट म्हणजे संयुक्त जबाबदारीच्या तत्वाचे त्यांनी केलेले कठोर पालन. केवळ केंद्रीयच नव्हे तर प्रांतांच्या मुख्यमंत्र्यांनाही त्यांनी वारंवार दिल्लीला बोलावले व त्यांचे व केंद्राचे अतूट नाते मानले. संस्था (कॉंग्रेस) व शासन ह्यांतले अंतरही शास्त्रीजींनी कमी केले. कामराज ह्यांनी त्यांना सुयोग्य साथ दिली हीही गोष्ट नमूद करतो.





अनुक्रमणिका



## श्रेष्ठ मान, महान संधी

अखेर भारताच्या पंतप्रधानकीसाठी स्वातंत्र्यानंतर प्रथमच निवडणुक झाली. आणि जगांतल्या एका श्रेष्ठ व खंडप्राय देशाच्या लोकशाहीने श्रीमति इंदिरा गांधी ह्यांना बहुमताने निवडून आणले. पंडितजींसारख्या बुद्धिमान, ध्येयवादी, प्रयत्नशील, व चिरनव वृत्तीच्या श्रेष्ठ पित्याची ही शालीन सुकन्या त्यांच्याच गादीवर एका नव्या विश्वासाने जाऊन बसत आहे. हिंदुस्थानची पहिली स्त्री पंतप्रधान व जगातली दुसरी स्त्री पंतप्रधान होण्याचा श्रेष्ठ मान त्यानी मिळविला आहे. भारताच्या स्थिरपद लोकशाहीने त्याना एक महान संधी दिली आहे. नवा विश्वास त्यांच्यावर टाकला आहे. नव्या उमेदीच्या, तरुण रक्तालाच जणु हे आवाहन (व आव्हान) आहे असे आम्हास वाटते.

श्रीमति इंदिराजींचे आम्ही हार्दिक अभिनंदन करतो. त्याना सुयश चिंतितो.

—संपादक

आणखी एक महत्त्वाचा पायंडा शास्त्रीजीनी पाडला त्याला खंडप्राय देशाच्या लोकशाहीचे दृष्टीने फार महत्त्व आहे असे मला वाटते. व्यक्ति तितकी मते हे लोकशाहीने गृहित धरलेले तत्त्व आहे. ह्या मताना जास्तीत जास्त जवळ आणणे-त्यांतून जनकल्याणा'ा एक सामान्य कार्यक्रम ठरविणं हे लोकशाहीत गृहित कृत्य असते. शास्त्रीजीनी विरोधी मते धारण करणारेही लोकशाहीचे मूलाधार आहेत हे तत्व मान्य केले आणि आपल्या चतुर व प्रामाणिक वागण्याने त्यांनी विरोधी पक्षांचा विश्वास संपादन केला. केवळ कच्छ, पाकिस्तानी सेनेचे काश्मीर आक्रमण व ताश्कंद करार एवढ्यापुरतेच त्यांनी सहकार्य मागितले नाही, तर देशरचनेच्या कार्यात त्यांनी नेहमीच आपला एक हात पुढे ठेवला आहे आणि त्यांचा विनम्र व खऱ्या अर्थाने सहकार्याच्या त्या भावनेलाही विरोधी पक्षनेत्यांनी व जनतेनेही उत्स्फूर्त प्रतिसाद दिलेला आहे. शास्त्रीजींनी एक नवा विश्वास जनतेला दिला त्यामुळेंच शास्त्रीजींच्या मृत्यूनें आपला एक मित्र—सखा गेला आहे अशी वेदना जनतेच्या मनांत उमटली. विरोधी पक्षांयांबाबतची एक नवी रीत शास्त्रीजींनी अवलंबिली व अकारण राहणारी कटुता कमी केली. त्यांच्या विरोधाला कांही विधायक वळण लावण्याचा एक अक्षरशः नवा प्रयोग करून दाखविला. विरोधी पक्षीयही देशभक्त आहेत. त्यांच्यातही कांही बुद्धिमत्ता आहे. त्यांनाही कांही विधायक असे सुचूं शकते ही भूमिकाच भारताच्या राजकारणांत अगदी नवी होती. शास्त्रीजींनी मने जिकण्याचा हा असामान्य प्रयोग अतिशय सहजतेने केला. म्हणूनच आज त्यांच्या मृत्यूने कॉंग्रेसच्या कामराज नंदाइतकेच अतीव दुःख मुखर्जी—वाजपाय यांनाही झालेले दिसते. किंबहुना जनसाधारणाचा हा असामान्य नेता अवघ्या भारतालाच चटका लावून गेला आहे.

शास्त्रीजींच्या मनांत ऋजुता होती. कणव होती. उदंड माया होती तशीच खंबीरताही होती. म्हणूनच सुरुवातीला मी **विष्णुदास शास्त्री** गेले असं म्हटलं आहे. "वज्रादपि कठोराणि—मृदूनि कुसुमादपि", अथवा "मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास, कठिण वज्रासि भेदू ऐसे", ह्या जातीचे ते होते. ते प्रधानमंत्री झाले तेव्हा "हा खुजा—छोटा माणूस काय करणार?" म्हणून देशी—विदेशी पत्रकारांनी त्यांचा कांहीसा उपहासही केला. परंतु पंजाबी सुब्यासाठी तारासिंगानी केलेले उपोषण, हजरत बाल प्रकरण, शेख अब्दुल्ला प्रकरण, आसामच्या भाषिक दंगली, द्रविड मुनेत्रच्या नेतृत्वाने झालेल्या दक्षिणेतल्या हिंसक दंगली, पाकिस्तानचे कच्छ-काश्मीरचे आक्रमण, कैरों पटनाईक प्रकरण, टी. टी. कें. चा राजिनामा ह्या सर्व प्रकरणातून शास्त्रीजींची **विष्णुदास** वृत्ति कणखरपणें प्रगटली. ते स्वतःबद्दल फार कमी बोलत. पण १९५६ साली मेहबुबनगर रेल्वे अपघाताचे दायित्व रेल्वेमंत्री म्हणून स्वतःवर घेऊन त्यांनी त्यागपत्र दिले तेव्हां त्यांनी स्वतःबद्दल जे उद्गार काढले ते ह्या संदर्भात आठवतात. ते म्हणाले होते, "उंचीने मी लहान असल्याने आणि माझा आवाजही जरा लहान असल्याने अनेकांची अशी समजूत असण्याचा संभव आहे की, मी कणखर भूमिका कधींच घेऊं शकणार नाही. त्यांना मी एवढेच सांगू इच्छितो की, **मी प्रकृतीने धडधाकट नसलो तरी मनाने मात्र इतरांना वाटतो तितका दुर्बळ खचितच नाही.**" शास्त्रीजींनी १९५६ साली काढलेले हे उद्गार १९६४—१९६५ मध्ये त्यांनी जे अध्याय लिहिले त्यात सार्थपणे सिद्ध झाले आहेत. त्यांच्या कणखर वृत्तीचे मनोज्ञ दर्शन जाणवले ते पाकच्या आक्रमणाच्या वेळीं! काश्मीरबाबत भारतीय जनतेच्या भावना त्यांनी रोखठोक शब्दांत व्यक्त केल्या पण राजकारणांत शब्दांना 'अर्थ' व 'वजन' येते ते अखेर सामर्थ्यामुळेच! पाकने छुप्या हल्लेखोरां पाठोपाठ प्रत्यक्ष आक्रमण केले. छांबवरील आक्रमण सुरू झाले आणि शास्त्रीजींच्या राजकारणातील **'युद्ध कांड' 'अस्मिता कांड'** सुरू झाले. त्या काळांतले शास्त्रीजींच्या व्यक्तित्वाचे घडलेले दर्शन केवळ संस्मरणीय, चिंतनीय, पूजनीय असेच होते. त्या व्यक्तित्वाने एक नवा विश्वास जवा-

अनुक्रमणिका

णांत आणि जनतेत उत्पन्न केला. काजळी गळून पडली. नवा प्रकाश मिळाला. शास्त्रीजींच्या व्यक्तित्वाला आणि वक्तृत्वाला त्या काळांत तेजाची धार आली होती. त्यांनी स्वतः आघाडीवर जाऊन जवानांची पाठ थोपटली. छांब नंतरचे सारें युद्ध कांड हा शास्त्रीजींच्या पोलादी नेतृत्वाचा तेजस्वी अध्याय आहे. विशेषतः आंतरराष्ट्रीय सीमा ओलांडून सैन्याला 'प्रत्याक्रमण हें संरक्षणच' हा जो नवा संदेश त्यांनी दिला तो आज तरी जगाला थक्क करणारा असाच होता. त्यांत रणनीतीचा भाग असला तरी तो आदेश देण्याचे मोठे दायित्व मात्र शास्त्रीजींनी खंबीरपणे स्वीकारले हे नाकारता येणार नाही. त्या निर्णयाने ब्रिटनचे पंतप्रधान रागावले. पण कच्छ प्रकरणी त्यांचे म्हणणे मानणारे शास्त्रीजी डगमगले नाहीत. युद्धबंदी झाल्यावरही पाक आक्रमणे चालूच राहिली. तेव्हांही सैन्याला सतत दक्ष राहण्याचा व आक्रमकांना चोपून काढण्याचा आदेश त्यांनी दिला. पाक सेना समोर उभ्या ठेवून आम्ही सेना मागे घेणार नाही. असे शास्त्रीजींनी युनोला स्पष्ट शब्दांत बजावले. विमानदलाचा व पर करण्याचा, सियालकोट-लाहोर-राजस्थानच्या बाजूने सेना घुसविण्याचे आदेश शास्त्रीजींनी अतीव वेगाने दिले. आधुनिक भारतांत इतक्या वेगाने निर्णय घेण्याचे असामान्य कसब शास्त्रीजींनी प्रथम दाखविले. भारत-चीन संघर्षांत चुकीच्या सैनिकी मार्गदर्शनाने सेनेची मान खाली गेली होती. पाक आक्रमणाने ती मान ताठ झाली. शान वाढली. राजकीय व लष्करी नेतृत्वाचा अपूर्व संगम पाक आक्रमणाचे वेळी झालेला दिसून आला आणि आधुनिक भारताचा कायाकल्प घडून आला.

हीच खंबीर वृत्ति त्यांनी गोवा, दीव, दमण, पाँडिचेरी वगैरे भागांचे सूत्रचालन गृहखात्याकडे देतांना दाखविली शेख अब्दुल्ला काय किंवा डावे कम्युनिस्ट काय (स्थानबद्ध) यांचे वावतही उरी उदंड माया बाळगणारे शास्त्रीजी द्रवले नाहीत. झटपट आणि खंबीरपणे निर्णय घेण्याची क्षमता त्या माणसा-

# 'साधक' सन्मित्र हरपला



मृत्यु मोठा विनोदी आहे. लहरी आहे. विक्षिप्तही असला पाहिजे. त्या 'काळा'ला 'वेळ' 'काळ' कळत नाही—नसला पाहिजे. त्याला श्रद्धा, भावना कळत नसली पाहिजे. त्याची 'गणिता'ची पद्धत ही 'मानवी' गणितांपेक्षां वेगळी असली पाहिजे—असावीच ! कारण गेल्या महिन्यात त्याने जे थैमान घातले आहे त्याचे नेमके उत्तर त्याशिवाय कांही सापडत नाही. लालबहादुर गेले म्हणून भारताची सारी जनता शोकविव्हल असतांनाच त्या काळाने आणखी एक हात लांबविला आणि ताश्कंदवरून जी उडी मारली ती पुण्यांत ! 'दीपावली'चे एक सुहृद, आमचे गेल्या कित्येक वर्षांचे मित्र व मराठी माणसांचे एक जिव्हाळ्याचे मित्र न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ यांना त्याने नेमके त्याच दिवशी उचलले. योगायोग काय विचित्र पहा ! आदल्याच दिवशी काकासाहेबांचा सत्तरावा वाढदिवस होता. त्या दिवसापासून त्यांनी सार्वजनिक जीवनातून निवृत्त व्हावयाचा निर्णय घेतला होता. परंतु, मृत्यूला काकासाहेब हे पुण्याचे (व भारताचे—विशेषतः महाराष्ट्राचे) 'सार्वजनिक काका' आहेत हे ठाऊक होते—असले पाहिजे. त्यामुळें सार्वजनिक जीवनांतली त्यांची निवृत्ति ह्याचा अर्थ जणुं त्यांचा 'लौकिक मृत्यु' असे कांहीतरी विचित्र गणित त्याने मांडले असले पाहिजे. काकांचा सत्तरावा वाढदिवस होतो—ते निवृत्त होतात आणि मृत्यु अलगद येऊन त्यांना घेऊन जातो ह्या घटना पाहिल्या की मन सुन्न होते. गेल्याच महिन्यांत त्यांच्या पत्नी डॉ. अनुसूयाबाईंना अपघाती निधन प्राप्त झाले. काकासाहेबांच्या अलिकडच्या चढत्या काळांत त्यांनी त्यांना यशस्वी साथ—सोबत दिली होती. त्यांच्या अशा अपघाती मृत्यूचा ताण कदाचित् काकासाहेबांना सहन झाला नसेलही. पण त्यांची प्रकृति बिघडली व त्यांतच त्यांचा अंत झाला. आमचा एक सुहृद आम्ही गमावून बसलो. 'दीपावली'चा तर एक 'कुटुंबीय'च गेला आहे असे आम्हास वाटते.

काकासाहेब गाडगीळ ही व्यक्ति नव्हती, तर स्वातंत्र्याच्या व तदनंतरच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक व साहित्यिक चळवळींचा तो एक चालता बोलता इतिहास होता. काकासाहेब एक 'चळवळ' होते. एक 'चिंतन' होते. एक 'स्वयंप्रज्ञा' होती ती एक ! त्यांच्या व्यक्तित्वाला अनेक पैलू होते. आणि एकाच 'पैलू'त काकासाहेब आहेत असे मानणारांना ते कधीच गवसले नाहीत. कारण ते जितके राजकारणी होते, तितकेच ते उत्तम विनोदी वक्ते होते, पंडित होते, रसिक-ललित लेखक होते. भाषातज्ञ होते, उत्तम पार्लमेंटेरियन होते. कुशल वादपटु होते. संघटक होते. निर्भीड होते. अर्थशास्त्रीही होते. व्यासंगी होते. वाचक होते. ह्या विविध रुपांनी संपन्न व्यक्तित्व लाभल्यामुळेंच काकासाहेब राजकारण खेळले पण, रुक्षता त्यांच्या जवळपासही फिरकली नाही. गांधी—कॉंग्रेसशी त्यांनी सतत इमान राखले पण राजकारणी ढोंगांची बाधा त्यांना झाली नाही. त्यांच्यातला रसिक-कलावन्त त्यांनी सतत 'ताजा' राखला. ह्या ताजेपणातूनच, व्यासंग-भक्तितूनच ते पंजाबला गेले (राज्यपाल म्हणून) तेव्हां ते तिथली भाषा शिकले (साठीच्या पुढे) 'मराठी माणसाची कदर करावी काकांनीच' असे अनेक मराठी माणसें सांगतात. 'आम्ही भगीरथाचे पुत्र' लिहिण्यासाठी गो. नी. दांडेकर पंजाबला गेले. काकासाहेबांनी त्यांना सक्रिय आशिर्वाद दिला. माणसे ओळखणे, जोडणे व वर्षानुवर्षे राखून ठेवणे हा काकांचा 'स्वभाव' होता. दिलखुलास हंसणे व मिश्किल बोलणे हे त्यांचे वैशिष्टच होते. सतत 'नवे' राहणे, त्यासाठी नवनवीन वाचणे, जीवनाच्या विविध स्तरांत अनुभवांचे कुंभ गोळा करीत फिरणे, बोलणे आणि बोलते करणे हा






काकांचा छंद होता. त्यांतूनच एक संपन्न व्यक्तिमत्व त्यांना लाभले. राजकारणांतही ते पडले, मूलगामी चिंतन केले आणि 'क्लास मूव्हमेंटचे' रुपांतर 'मास मूव्हमेंट'मध्ये झाले. बहुजनसमाजांत गांधींची चळवळ त्यांनी नेली. आणि जेधे-गाडगीळांनी पुणें महाराष्ट्र गाजविले. अनेक व्याप सांभाळून त्यांनी अपार ग्रंथ निर्मितीही केली. त्यांत राजकारण, अर्थशास्त्र, विधि कारणाप्रमाणेच ललित लेखनही आहे. ग्यानबाचे अर्थशास्त्र, राज्यशास्त्र विचार, घटना प्रबोधिनी, राज्योपनिषद् सालगुदस्त, माझे समकालीन, अनगड मोती, स्मृतिकोष, माझा येळकोट व पथिक (आत्मचरित्र) ही पुस्तकें त्यांच्या गाजलेल्या पुस्तकात मोडतात. निर्भीडपणें विचार मांडून पक्षशिस्त ही काकांनी पाळली म्हणून संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलनाचे वेळी त्यांजवर टीकाही झाली. त्यानंतरही जिथें पटले नाही तिथे काका बोलतच राहिले. जनहिताची तळमळ हेच त्याचे कारण होय! पंजाबच्या राज्यपालपदाचे ('आळशी'पणाचे जिणे त्यांच्या स्वभावाला मानवले नाही, 'उत्साहमूर्ति' काकांना ते 'उत्सव मूर्ति' बनून राहणें परवडले नाही. काकांनी राजिनामा दिला आणि ते 'आपल्या' पुण्यात आले. पुणे विद्यापीठाचे कुलगुरुपदी त्यांची नियुक्ति झाली. साहित्यसंमेलनाध्यक्षही ते झाले. ह्या व्यापांतही काका "ताजे" होते. दीपावलीच्या दिवाळी अंकांत व नेहरू अंकात काकांनी अमोलिक विचार मांडले. आज काकांच्या मृत्यूने एक रसिक मित्र, एक साधक सन्मित्र आम्ही गमावून बसलो आहोत. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखांत त्यांचेच 'एक कुटुंबीय' या भावनेने आम्ही सहभागी आहोत. ईश्वर मृतात्म्यास शांति देवो.

–संपादक

जवळ होती आणि म्हणूनच अल्प काळांत त्यांनी कितीतरी महत्त्वाचे निर्णय घेतले. त्यांचा उरक मोठा होता. कामावर त्यांची पकड होती. Vision होती. द्रष्टेपण होते. सेवापरायणता होती. सुरक्षा मंडळ तील 'राजकारणा'लाही त्यांनी अचुक ओळखले आणि त्याचे 'वस्त्रहरण'ही त्यांनी केले. खंबीर नेतृत्वाला स्वयंपूर्णतेचे वरदान हवे हे त्यांनी भारत-पाक युद्धांत ओळखले आणि 'जय जवान' ह्या घोषणेबरोबरच 'जय किसान' अशी नवी घोषणा दिली. आज तो नवराष्ट्रनिर्मितीचा मंत्र बनला आहे.

'ताश्कंद करार' ही शास्त्रीजींची कसोटी होती. खंबीर भूमिका घेऊन ते तेथे गेले. शांति-सद्भावना होतीच. ताश्कंद कराराने देशांचा (दोन्ही) काय फायदा झाला वा होणार आहे हे कालान्तराने ठरणार आहे. पण ताश्कंद करा राची फार जबर किंमत त्यांच्या मृत्यूने भारताने आधीच दिली आहे खास! आजच्या युद्धनीतीत 'निर्णायक विजय' कुणाचाच होत नाहीं. ताश्कंदमध्येही हेच घडले आहे. पण सद्भावनेने केलेला एक प्रामाणिक प्रयत्न म्हणून तो करार नोंदविला जाईल. शास्त्रीजींच्या मनावर मात्र त्याने असह्य ताण पडला आणि त्यांतच त्यांचा अंत झाला. अवघ्या अठरा महिन्यांत एक आधुनिक चमत्कार करून शास्त्रीजी शांतपणे निघून गले आहेत. त्यांचा मृत्यु हा त्यांच्या तेजस्वी 'गीतेचा' सुयोग्य शेवट आहे. त्यांच्या मृत्यूने त्यांना आपल्यांतून उचलून नेले असले तरी **'नसे मृत पहा सेनानी'** असेच त्यांच्या स्मृतीकडून आवाहन मिळत राहील. रणांगणावर गीता घडविणारा हा महापुरुष अखेर रणांगणावरच पडला आहे. शास्त्रीजींच्या मृत्यूनेच त्यांना अमर केले आहे. **"मरणा न भीत तुज मी"** असे बजावीत शास्त्रीजी जगले आणि अठरा अध्यायांची सुवर्ण पृष्ठांनी नटलेली 'आधुनिक गीता' ह्या 'महाभारता'ला देऊन निघून गेले आहेत.

त्या 'श्रीकृष्णा'च्या स्मृतीला अभिवादन असो.

–आदित्य

## पंतप्रधान शास्त्रींची 'ती' स्वच्छ खोली

दिवंगत पंतप्रधान शास्त्रींच्या १० जनपथ येथील सरकारी निवासांतील त्यांची बैठकीची खोली अगदीं स्वच्छ नि टापटीप आहे. त्यांच्या मेजावर कामासाठी रेंगाळणारी एकहि फाईल नाही.

चार टेलिफोन असलेल्या त्यांच्या लांबट मोहागनी मेजासमोरच भारत व शेजार राष्ट्रांचा मोठा नकाशा लावलेला असून त्यावर नुकत्याच झालेल्या भारत-पाक संघर्षाची झळ लागलेले भाग दाखविण्यांत आले आहेत. टोंचलेल्या रंगीत पिनांच्या साह्यानें 'भारताने बाँबमारा केलेले विमानतळ', "पाकिस्तानने बाँबहल्ला केलेल्या जागा," 'भारतीय फौजांनी मुसंडी मारलेल्या जागा,' 'भारताने काबीज केलेले भाग,' 'भारतांतील पाकिस्तानचे आक्रमण', 'पाकिस्तानी छत्रीधारी सैनिक उतरलेले प्रदेश' व 'भारतीय फौजांची चढाई नि काबीज केलेले मार्ग' दर्शविण्यात आले आहेत.

बाजूच्या मेजावर हिमाचल प्रदेशांतील 'गिरी बहुविध प्रकल्पा'वरील अहवाल ठेवण्यात आला आहे. भिंतीवर महात्मा गांधी व जवाहरलाल नेहरू ह्यांची भव्य तैलचित्रें टांगण्यात आलीं आहेत.

त्यांच्या ग्रंथालयात 'वर्ल्ड पीस थ्रू वर्ल्ड लॉ'पासून 'न्यू क्लिअर एक्स्प्लोजन्स अँड देअर इफेक्टस्'पर्यंतची विविध प्रकारचीं पुस्तकें आहेत. त्यांत १९५३ ते ५७ मधील कै. जवाहरलाल नेहरूंचीं भाषणें; 'अँटॉमिक फिझिक्स', 'हिस्टरी ऑफ उर्दू' व 'राष्ट्रीय नियोजना'च्या बाइंड केलेल्या सर्व प्रती आहेत.

अनुक्रमणिका








**सुरेश वेंगुर्लेकर**

**ऊन** फारच कानशील चावू लागलं तसा तो चुळबुळला. त्यानं मान वळवली आणि उन्हाचा भाला नेमका त्याच्या डोळ्यांवर पडला. त्याचा नाईलाज झाला आणि तो खाटल्यावर उठून बसला. जांभई देत त्याने विचारलं–, "भेंचोद कितना बजा बे–?"

त्याच्या प्रश्नाला कुठूनही उत्तर आलं नाही. त्याचा प्रश्न ऐकायला जवळपास कुणी नव्हतंच. त्यालाही प्रश्नाचं उत्तर हवंच होतं अशातला काही भाग नव्हता. जांभई देताना तेवढे शब्द उच्चारायला त्याला बरं वाटलं होतं इतकंच.

उठून बसल्यावर मात्र त्याला वाटलं–उठलो हेच बरं झालं. अवघ्या एकाच जांभईवाटे शरीरातला सगळा आळस निघून गेला होता. कसं त्याला छान हलकं हलकं वाटत होतं. तो हसला. सरळ सरळ त्या दुनियेशी दिल खुलास हसला.

मग तो खाटल्यावरून उठला. अंथरूण गुंडाळून त्यानें जिन्या-खाली सरकवून दिलं. खाटलं भिंतीशी उभं करून ठेवलं. त्याच्या पावलांनी सवयीची–रूस्तुम कॅफेची वाट धरली.

त्याच्या हालचालींना आता गति प्राप्त झाली होती. चालताना त्याला वाटत होतं आपल्या शरीरातून काहीतरी गुदगुदल्या करीत वहात राहील आहे. कॅफेतल्या वॉशबेसीनवर तो आला. चेहेऱ्यावर त्याने थंड पाण्याचे हबकारे मारले. आणि तो अधिकच खुलला. रोजच्यापेक्षा चार चुळका त्याने जास्त टाकल्या. चांगलं खळाळून तोंड धुतलं. खिशातून चुरगाळलेला रुमाल काढून तोंड पुसणं आज त्याला रूचलं नाही. थोडा वेळ तो उन्हात येऊन उभा राहीला. उन्हानेच त्याने ओलं तोंड वाळवून घेतलं. मग तो कोपऱ्यावरच्या त्याच्या नेहेमीच्या खुर्चीवर येऊन बसला. ऑर्डरवाल्याने आत आवाज दिला – "लक्ष्मण दादाकी चाय-बुरून लाव . . ."

पण ऑर्डरवाल्याला त्याने हटकलं.

"अबे ए रूस्तुमके बच्चे आज चाय् बुरून नहीं होना. अेक फाकडू काफी बनाव."

ऑर्डरवाल्याने आत आवाज दिला–

"चाय बुरून कॅन्सल. एक फसकिलास काफी बनाव."

आंतवाल्याने ऑर्डरवाल्याला आश्चर्याने विचारले–

"काफी किसको–लक्ष्मण दादा को ?"

"हा साले आज जेंटलमन बन गया."

ऑर्डरवाल्याने कॉफीबरोबर त्याच्या टेबलावर टाईम्सही आणून ठेवला तेव्हा त्याची मस्करी तो उमजला. ती मस्करी त्याला आवडलीही. खुशीत येऊन तो म्हणाला–

"क्युवे भोसडीके लक्ष्मणदादाकी मजाक कर रहा क्या–? ला, . . . ला साले आज मैं टैम्स भी पढूंगा."

कॉफी जास्त गरम होती. ती निवू देत खरंच त्याने टाईम्स

**श्रावण मेघाला रुपेरी किनार असावी, काजळ रातीला चंद्रकोरीने आगळी रूपकळा द्यावी, तशीच रूपकळा लक्ष्मणदादाच्या मनांतही चमकून गेली.**
**—पण बिमार दुनियेला तिचें दर्शन घडलेंच नाहीं.**

उघडला. पहिल्या पानापासून शेवटच्या पानापर्यंत सगळे फोटो आणि जाहीरातीची चित्रं पहाताना तो मनापासून रमला. 'सर्फच्या' जाहीरातीतली शुभ्र फ्रॉक घालून दोरीवरच्या उडया मारणारी पोरगी त्याला आवडली. पुरेशा निवलेल्या कॉफीचे घुटके घेत घेत ती पोरगी तो न्याहाळू लागला.

त्याला एकदम तारीची आठवण झाली. शुभ्र पोषाखातली ही पोरगी छान होती खरी पण तिला हसता कुठे येतय? हिच्या या फोटोऐवजी आपल्या तारीचा हसतानाचा फोटो इथे छापला असता तर काम एकदमच बेस्ट दिसल असतं. कॉफी पिऊन झाली तरी कितीतरी वेळपर्यंत त्या चित्रात तो हसऱ्या तारीचाच चेहेरा पहात राहीला.

काऊंटरवर त्याने नोट टाकली तेव्हा आश्चर्याने त्याच्याकडे पहात इराण्याने विचारलं—"

"हीसाबमे नही लगाना क्या ?"

"नहीं. आज का मामला उधार नहीं होगा."

"क्या बात है लक्ष्मण दादा—?"

"बस यूंही. दील खूष है!"

"संवयीप्रमाणे इराण्याने चारमिनारचं पाकीट समोर ठेवलं. त्याने तेही वापीस केलं.

"आज क्याप्स्टन होना."

कॅप्स्टनचं सुबक सफेद पाकीट घेऊन तो कॅफेतून बाहेर पडला. पाकीटाची ही नवी शान त्याला खूप आवडली. ते न खोलता तसच नुसतं हात त कुरवाळताना त्याला अधिक मजा वाटत होती. पुनः तो चाळिच्या जिन्याशीं आला.

जिन्याशेजारच्या भितीवर चाळीचं इलेक्ट्रीक मिटर्सचं भलं मोठं कपाट होतं—ते त्याने खोललं. त्या कपाटातच त्याची सगळी इप्टेट असे. आरसा...फणी, तेल...खाकी फेसपावडर अशा त्या वस्तु होत्या. या वस्तूंना तो आपली इप्टेट म्हणत असे. कॅप्स्टनचं पाकीट कपाट त टाकून तिथला साबण त्याने उचलला. कंपाऊंडच्या कट्ट्यावर वाळत पडलेला टॉवेल ओढून नळावर तो आंघोळीला आला.

नळाखाली बाया धुणी धूत होत्या. आल्या आल्या त्याला त्यांनी जागा करून दिली. तो नळावर आला की बाया कधीच त्याचा खोळंबा करीत नसत. तोही चाळींतल्या बायांच्या वाटेला कधी जात नसे. त्यांचा आब तो राखून होता. त्याचा दरारा त्या मानून होत्या.

बायांच्या आणि त्याच्या अशा या सुरळीत संबंधाना न शोभणारी एक गोष्ट मात्र होती—त्याला वाटे आंघोळ करताना या बाया आपल्या अंग चोळण्याकडे विशेष लक्ष देऊन असतात. पण आज कितीतरी वेळपर्यंत त्याने अंग घासून घासून मनसोक्त, आंघोळ केली—तरी बायांचे आपल्या उघडया अंगाकडे डोळे लागून आहेत ही नेहमीची जाणीव कशी ती त्याला पोहोचलीच नाही. तो आपल्याच नादात होता.

कमरेला टॉवेल लावूनच तो चाळीखालच्या इस्त्रीवाल्या भैय्यापाशीं हजर झाला.

"खजरू भैय्या—"

"बोलो लक्ष्मण दादा."

"आज कुछ अच्छे कपडे पेहेनना चाहता हूं."

"वो तुमरा लालवाला खमीस दूं ?"

"नहीं यार आज बिलकूल सफेद कपडे पहेनूंगा"

" व: भई—नसीब उन कपडोंका — वो तो कबसे मेरे पास पडे हुवे है!"

खजरूच्या दुकानातच त्याने पांढरी पाटलोण—पांढरा खमीस अंगात चढवला. मोठ्या हौसेने हे कपडे त्याने शिवले होते. पण पहिल्यांदा त्याने ते अंग त चढवले तेव्हा त्याचा तोच त्याला एकदम परका वाटला होता. काहीं काहीं तासातच ते कपडे उत-रवून त्याने धुवायला काढले होते. त्यानंतर आज तो ते कपडे घालत होता. पण आज मात्र त्याला त्या दिवशीचा तो परकेपणा जाण-वला नाही. त्या कपडयांनी आज त्याला आपलासा करून घेतलं होतं.

चाळीच्या जिन्याशी तो आला. भितीतलं कपाट त्यानं खोललं. आरसा—फणी काढली. केसांना वेताचं तेल लावलं. तेलाचे हात ओल्या टॉवेलवर घासून घासून स्वच्छ केले. मग त्या हाता-वर खाकी फेस पावडर घेऊन त्याने ती चेहेऱ्यावर चोळली. आरशात चेहेरा पाहून तो मनोमन खुलला.

'इष्टेट' कपाटांत बंद करताना कपाटाच्या आतल्या बाजूला चिकटवलेली सुरैय्या त्याच्या बरोबर हसल्यासारखी त्याला वाटली. हिंदी सिनेमाच्या दुनीयेत पुष्कळ नव्या हिरॉईन्स आल्या होत्या तरी अजूनही तो सुरैय्यालाच चाहत होता. पण आता या वेळी मात्र ती त्याच्याकडे पाहून हसल्याचा जो त्याला भास झाला त्याने तो बिघडला. पुनः त्याला अचानक तारीची खूप आठवण झाली. त्याला वाटलं आपली तारी एवढी मोठी झाली असती तर हसताना हिच्यापेक्षा खूबसुरत दिसली असती.

उगाचंच एकदम फोटोंतल्या त्या सुरैय्यावर तो उखडला.

"चल हट वे लवंडी—"

इतक्या दिवसापासूनची तिची स्थापना अशी अचानक संपली. फोटोचा कागद टरकावतानाचा आवाज त्याला खूप आवडला. त्या आवाजावर खूष होऊन तो भरघोस हसला.

इथवर सगळं तो एका नादात करत आला. पण आता कपडे वगैरे करून झाल्यावर त्याला प्रश्न पडला—पुढे काय ?

नेहमी या वेळेला तो चारमिनार फुंकत खाटल्यावर बस-लेला असे. हळू हळू त्याच्या धंद्यातली पोरं त्याच्या भोवती गोळा






होत असत. त्याने खाटलं भिंतीशी उभं होतं ते जमीनीवर पाडलं. कपाटातल्या कॅप्स्टनच्या पाकीटाची त्याला आठवण झाली. त्याने पाकीट बाहेर काढलं. ते खोलत खाटल्यावर बसायच्या विचारात तो होता. पण तो विचार त्याने बदलला. त्या स्वच्छ सफेद कपडयात खाटल्यावर बसावसं त्याला वाटेना. आणि आज कपडे परके वाटत नव्हते. खाटलंच सध्या नको झालं होतं. पुनः ते त्यानं भिंतीशी उभं करून ठेवलं. चाळीच्या दर्शनी पायऱ्यांवर उभं राहून त्यानं कॅप्स्टनचं पाकीट खोललं.

तेवढ्यात पावलू तेथे टपकला.

"भेंचोद वो लवू–गिऱ्हाईक है बोलके दो बाटली लेके गया और खूद हजम किया लक्ष्मण दादा. आज दूसरे टायम ऐसा किया. सालेकु आदही पड गयी. किसनका अेक रूपया बाकी है. काणा और जाफरने पूरे पैसे दिये."

पावलूने त्याच्या समोर पैसे धरले. काही नोटा होत्या. थोडी चिल्लर होती. त्याने फक्त नोटा उचलल्या.

"चिल्लर तुमको रखना. और आज के लिये धंदे की बात बंद."

"रेडवाले आ रहे है क्या?"

"नहीं फिर भी आज धंदा नहीं होगा."

पावलू त्याच्या तोंडाकडे पहातच राहीला. तो कॅप्स्टन पितो आहे हेही त्याच्या आत्ता लक्षात आलं.




"आयला क्याप्स्टन! खुशी मे हो लक्ष्मण दादा?"

"हा आज जेंटलमेन बन गया हूं."

"हॅत्तेरेकी.... साले कोई कोई जेंटलमेन लोग सिगरेटच नहीं पिते."

त्याने सिगरेटचा नुकताच पहिला झुरका मारला होता. पण पावलूचं म्हणणं ऐकून तो म्हणाला–

"हा, हा जेंटलमेन लोग सिगरेट पितेच नहीं."

आणि त्याने नुकतीच शिलगावलेली आख्खी सिगरेट टिचकीने रस्त्यावर उडवली. पावलू चाट पडला. आधाशासारखा रस्त्यावर पडलेल्या त्या सिगरेटीकडे पहात राहीला.

"आयला. ये क्या किया लक्ष्मणदादा. तुमको नहीं पिना था तो हमको क्यों नहीं दिया."

"ले—साले. पी कितना पिते है वो."

"पावलू पाकीटावर तुटून पडला. घाईने त्याने पाकीटातली सिगरेट तोंडात खुपसली... शिलगावली. त्याने पाकीट परत मागीतल नाही. पण आख्खा पाकीट आपल्याला दिलंय यावर पावलूचा विश्वास बसेना.

"पूरा पाकीट हमको दिया लक्ष्मणदादा?"

"हा."

"आयला. भोत खुसीमे हो तुम. ये कायकी खुसी है ये भी तो बता?"

"बस आज याद आ रही है... खूब याद आ रही है."

"हॅत्तेरेकी... वो याद की भी अैसीकी तैसी! कौन है ये यादवाली?"

"थी. अब नहीं है."

"आयला ये तो कुछ दर्द की बात मालूम हो रही है. कौन थी वो लक्ष्मणदादा?"

"भेन हमारी."

"आयला–भेन?"

"हा. तारी नाम था अुसका. बस... बस... बस... ऐसी मिठी हांसती थी... पुछो मत."

"हुवा भी क्या उसको लक्ष्मण दादा?"

"माता की फोडीने खा लीया."

"बापरे बाप. पुरे चेहेरे की सत्यानाश!"

"बस... जिस दिन सुना की तारीको माता की फोडी आ गये उसी दीन घरसे भाग निकला. क्या बतावूं पावलू... तारी जब हांसती थी ना इतनी मासूम लगती थी... उसी चेहेरे की कोई भयानक हालत मैं कभी नहीं देख सकता... सच कहता हूं पावलू मै जो भाग आया ना... भोत अच्छा किया. अब जब भी तारी की याद आती है मै उसका वही चेहेरा देख सकता हूं.... मीठी हंसीवाला मासूम चेहेरा...."

पावलूला हे सारं नवीन होतं. हा लक्ष्मणदादा नवा होता. त्याच्या आयुष्यांतली ही गोष्ट पण निराळी होती. काय बोलावं

त्याला समजत नव्हतं. तोंड उघडं टाकून तो नुसता ऐकत राहीला होता. तोंड उघडं टाकून ऐकत राहीलेला पावलू बघून त्याला गंमत वाटली. त्याच्या एक टपलीत हाणून तो म्हणाला–

"क्युंबे साले तूं तो जैसे पिक्चरकी स्टोरी सून रहा है."

पावलू ओशाळला. पण पिक्चरचं नांव निघताच तेवढ्यातही तो खुलला. म्हणाला–

"लक्ष्मणदादा साले राजकपूर का संगम की टीकीटच नहीं मिलता. भेंचोद आज कुछ भी करके घुसेगा. तुम भी चलो ना लक्ष्मणदादा."

"तूं भाग बे अभी यहां से. मै आज अकेला ही घुमेगा."

पावलू गेला. जाणाऱ्या पावलूकडे तो पहात राहीला. त्याला आठवलं–घरातून आपण पळालो तेव्हा आपण पावलू एवढेच होतो. आपल्यालाही असाच सिनेमाचा जबर नाद होता. घरातले पैसे चोरून आपण सिनेमा पहात होतो... म्हातारा म्हातारी शिव्या देत होती तरी शाळेला जात नव्हतो. तारी मात्र परकर पोलका घालून नीट शाळेला जायची. सगळ्याना राग आला तरी तारीला मात्र आपला कधीच राग येत नव्हता. बंद मूठ आपल्या समोर धरून विचारायची–'ओळख बघू...' मूठीत तिच्या गाभुळी चिंच असायची. तिलाही एकदां गुपचुप आपण सिनेमा दाखवणार आहोत म्हणून सांगितलं होतं... त्यावेळी ती आनंदाने अशी गोड हसली होती...तारीला सिनेमा दाखवायचं राहूनच गेलं...

तो विलक्षण अस्वस्थ झाला. तारीचा लाघवी हसरा चेहेरा त्याच्या आठवणींशी लपंडाव खेळू लागला. तारी या जगांत नाही हे मान्य करणं त्याला अशक्य होऊ लागलं.

डोक्यात काहीं कल्पना घेऊन झप झप पावलं टाकत तो निघाला...

म्युनिसीपालटीच्या शाळेसमोर तो आला तेव्हा शाळेला मधली सुट्टी झाली होती. मुलं शाळेच्या इमारतीतून बाहेर येत होती... चिक्कीगुडदाणीवाल्यापाशीं... चिंचा बोरं घेऊन बसलेल्या बाईपाशी, गर्दी करू लागली होती. त्याने गुडदाणीवाल्याकडची सारी गुडदाणी विकत घेतली. पोरांना वाटून टाकली. पोरांनी एकच गिल्ला केला. आरडा ओरडा करून झोंबून त्याच्याकडून चिक्की-गुडदाणी पळवली. पोरांच्या दंगामस्तीने त्याला बरं वाटलं. पण लगेच त्याच्या लक्षात आलं या गडबडीत गर्दीतल्या चारदोन चिमुरड्याजवळ येण्याऐवजी दूरच गेल्या होत्या.

दम देऊन पोरांना त्यानं दूर पिटाळलं. मोठ्या आशेने त्याच्या पावलांनीं चिंचा बोरं घेऊन बसलेल्या बाईची दिशा धरली.

बाईभोवती चार सहा पोरींचा पुंजका होता. तारीसारखी परकर पोलका घातलेली त्यात कुणीच नव्हती. तरीही त्यातल्या एकीचा चेहेरा तारीच्या चेहेऱ्याशी जुळत असल्याचं त्याच्या मनाने ठरवलं. ती चिमुरडी त्या बाईपाशी तक्रार करत होती–

"ही हिरवी चिंच नको ग मला. चांगली गाभुळी देना..."

गाभुळी गेली बाळंत व्हाया. हाईत या अशा हाईत. पायजेल तर घ्ये."

"अग पण थांबशील तर जरा. मी शोधते तरी."

"ये ऽऽऽ चान्ने–कां ढवळतीस उगीच. सांगीटलं नव्हं. हाईत या अशा हाईत म्हून."

आता बाजुला नुसतंच उभं रहाणं त्याला शक्य नव्हतं.

"का ग ये–चिंचोके नाही, पैशेच घ्यायाचीस. घावली एखादी तिला गावळी तर काय खरंच व्हायचंय काय तुझं?"

"तू रे कोन बावा? अे पोट्टे हात लावू नग पाटीला."

च्या आयला. मी कोन इचारत्ये? लक्ष्मणदादा म्हणतात या जीवाला. धंदा करायचाय ना तुला? घे ग तूं शोधून गाभुळी. काय करत्ये बघतो. थांब नाय तर. मीच देतो शोधून तुला."

त्याच्या बदललेल्या अवताराने बाई लगेच नरम आली. तरी ती थोडी कुरबुरलीच.

"जबरदस्तीच झाली की गा आता. दोन पैशाच्या चिंचा नी आठ आन्याचं ढवळनं."

फणकाऱ्याने तो उठून उभा राहीला. खिशातून आठ आण्याचं नाणं काढून त्यानं बाईच्या अंगावर भिरकावलं. खाली बसून तो

अपेक्षा........

........पूर्ति

पुनः चिंचा ढवळू लागला. आणि खरंच त्याला एक गाभुळया चिंचेचं बोट सांपडलं. आनंदाने तो ओरडलाच–

"ही बघ सांपडली गाभुळी....''

पण त्या मुली आता तिथं नव्हत्याच. या सगळया दंगा-मस्तीला विथरून त्या या वेळपर्यंत शाळेच्या दारात पोहोचल्या होत्या. ती चिमुरडी मात्र अजून वळून पहात होती. मोठया आशेनं आवर्जून तो तिला म्हणाला–

"ये–येना. ही बघ सांपडली गाभुळी....''

पण तेवढयात घंटा झाली. इतर मुलींबरोबर तीही शाळेच्या आवारात शिरली.

ती शाळेच्या इमारतीत शिरून दिसेनाशी झाली तरी अजूनही तो त्या दिशेने पहात उभा राहीला होता. त्या मुलीला अगदी तारीसारखीच गाभुळी चींच आवडत होती. ती मिळाली असती की ती गोड हसणार होती. बस त्याचा सगळा खटाटोप एवढयाच-साठी होता. कुणीतरी बच्चीनं आज त्याच्या तारीसारखं दील खीलून हसावं एवढीच त्याची अपेक्षा होती. बिलकूल मामुली. आणि सगळं जुळूनही आलं होतं पण थोडक्यात हुकलं होतं.

बाईला हसूं येत होतं. पण त्याच्या धाकाने तोंडाला पदर लावून तिनं ते दाबून धरलं होतं. रागाने त्याने चिंचेचं बोट पाटीच्या दिशेने भिरकावलं. तिच्याकडे पहात रस्त्यावर पचकन् थुंकून तो म्हणाला–

"थूत तुज्या आयला..."

तिला सपाटून शिवीगाळ करावी...सारी पाटी उलथून टाकावी अशी जबरदस्त इच्छा त्याला होत होती. पण त्याने ती दाबून टाकली. धूमसत तेथून पाय काढला.

नाक्यावर तो पोहोचला. बसस्टॉपवर एक बस आली होती. आंत शिरायला लोकांची झुम्मड उडाली होती. त्याची दीशा अनिश्चीतच होती. तो त्या गर्दीत शिरला. पुढचे बरेच खालीच राहीले. तो मात्र आत घुसला. उप्परवाल्या कंडक्टरने आवाज दिला–

"सीर्फ एक भेजोऽऽ."

आताही पुनः बाकीच्याना मागे सारून चपळाईने तो वरच्या डेकवर पोहोंचला.

जिन्यापासच्या तीन सीट्सपैकी एक खाली होती. दुसरी कुठलीच 'शीट' खाली नाही याची खात्री करून घेत नाईलाजानें तो या सीटवर बसला. बसल्या बसल्या त्याने गर्दीत चुरगाळलेले कपडे जरा नीट नेटके केले. पण तेवढयात त्याच्या शेजारी बसलेली तरुण मुलगी उठली आणि तिच्या पलीकडे खिडकीशी बसलेल्या कुणा लहान मुलीला मध्ये बसवून आपण खिडकीशी बसली.

त्याच्या मस्तकात एकदम कीडा वळवळला. तिच्याआयला हे एकदम असं काय झालं हिला? काय मी धरली का चावली? तेवढयात कंडक्टरने त्याच्या समोर पंच वाजवला. कुठलं तरी तिकीट काढायला हवं होतं. त्याने 'लॅमिंग्टनरोड' मागितलं.

"ताई मला दिसत नाही ना–''

त्याच्या शेजारच्या लहान मुलीने त्या तरुण मुलीकडे तक्रार केली. पण तिच्या त्या ताईने तिला दटावलं. म्हणाली–

"काय पहायचंय तेच तेच पुनः पुनः पहील्यांदाच मुंबईत आल्यासारखी करूं नकोस. बैस तिथंच नीट''

आपल्यावरच्या अन्यायाने घुसमटत ती लहान मुलगी तिथंच चुळबुळत बसून राहिली.

त्याच्यावर कुणी जादू केल्यासारखा तो त्या लहान मुलीकडे आता पहात राहीला. या मुलीचा आवाज तारीच्या आवाजाशीं विलक्षण जुळणारा होता. तिचा चेहेरा...तिची अंगलट हुबे-हूब तारीचीच होती. आणि तिने तारीसारखा परकर पोलका सुद्धा पेहेनला होता. तिच्या परकर पोलक्याचं कापड जास्त ऊंची होतं आणि गळयात काळया दोऱ्या ऐवजी सोन्याचा छडा होता एवढाच काय तो फरक होता. हो आणि मुख्य म्हणजे ती बिलकूल हसत नव्हती. पण काहीही करून तिने हसायला हवं होतं. हवंच होतं.

"नीट बैस-पाहू कशी.''

त्या तरुण मुलीनें उगाचंच तिला ढोंगसलं. ती वापडी थोडी चुळबुळली आणि पुनः होती तशीच बसली. नीट म्हणजे तिने आणखी कसं बसायला पाहिजे होतं त्यालाही कळल नाही. तिचा चेहेरा मात्र जास्तच वापुडवाणा झाला. कपाळाला आठया घालून त्याने तिच्या ताईकडे पाहीलं. बस थांबली होती. आणि ती खिडकीतून वाकून बसस्टॉपवरची रांग न्याहाळत होती.

"साली दुनीयावी अजीब है''

तो मनाशीं पुटपुटला.

पुनः त्या मुलीची बडबड सुरू झाली. ती विचारत होती–

"ताई आज तरी आपल्याला तिकीटं मिळतील का ग?''

तू विचारू नकोस पाहू. नेहमी मी 'हो' म्हणते आणि तिकीटं काहीं मिळत नाहींत. मिळाली तिकीटं की पहाणारच आहोत आपण सिनेमा.''

हे असंच चाललं होतं. ती मुलगी कहीं ना कहीं बडबडतच होती. तिची ती ताई प्रत्येक वेळीं तिला दटावतच होती. कुठल्याच प्रश्नाचं सरळ उत्तर देत नव्हती. त्या मुलीचा चेहेरा अधिकच रडवेला होत होता. वास्तविक खुदानं हुबेहुब तारी सारखी ही मुलगी अगदी त्याच्या शेजारी आणून बसवली होती. तिनं फक्त थोडं हसायचं होतं की एका क्षणापुरती त्याची तारी त्याच्या शेजारी जीवंत होणार होती. पण खिडकीतली ती मेमसाब मोठी पुष्ट होती. तिच्यावर तो खूपच संतापला होता आणि अडचणीची गोष्ट अशी होती की त्या चिंचाबोरंवाल्या बाई-सारखा हिच्याशी दंगा करायची सोय नव्हती. आत...आत तो धुमसत राहीला. स्वतःवरही चिडला. साला आपल्यालाही तिला कायवी जोक करून हसवता येत नांय म्हणजे काय?

तेवढयांत तो बसला होता त्या बाजूच्या रस्त्यावर कसली तरी मिरवणूक वाजत गाजत आली. पटकन ती मुलगी उठली





आणि त्या बाजूच्या खिडकीत जाऊन उभी राहीली. त्याला एकदम बरं वाटलं. खूप आशा निर्माण झाली. मिरवणुकीत तरी काही घडेल आणि ही बच्ची हसेल म्हणून तिच्या चेहेऱ्यावर टक लावून तो पहात राहीला.

पण पुनः त्या तरुण मुलीनं तिला हटकलं–

"इश् हे काय? नीट जाग्यावर येऊन बैस कशी."

मुकाट ती जाग्यावर येऊन बसली. तिचा चेहेरा जास्तच विमार दिसू लागला. तिच्यावरचा अन्याय त्याच्या काळजात अधिकच ठसठसू लागला. त्याला खुप जोराने वाटलं की त्या बडया मेमसाहेबला विचारावं–पोहिला असता तिनं थोडा जल्लोष तर पोरगी काय बाटणार बिटणार होती काय? पण नेमके शब्द कसे रचावेत त्याला लवकर उमगलं नाही. तोवर मिरवणूक मागे टाकून बस पुष्कळच पुढे आली. त्रासिक चेहेऱ्याने त्याने तिच्याकडे सरळ सरळ पाहीलं. तिने उगाचच पदर सावरला आणि ती खिडकीबाहेर पहात राहीली.

ग्रँटरोड आलं आणि ती उठलीच. त्या मुलीला हाताला धरून तरा तरा खाली उतरली.

ती त्या बच्चीसह उतरून गेली आणि तो बसूनच राहीला. झक् मारली आणि लॅमींग्टन रोडचं तिकीट मागीतलं असं त्याला झालं. ती साली आधीपासूनच आखडत होती त्यामुळे मुद्दाम तिच्या मागोमाग अलीकडच्याच स्टॉपवर उतरायचा धीर त्याला झाला नाही.

बस पुढे निघाली. आता मात्र त्याचा जीव जास्तच चुटपुटला. त्याला आठवलं. त्या दोघी सिनेमाला निघाल्या होत्या. तिकीटं मिळतील का नाही म्हणून ती लहान मुलगी खूपच फिकीर करत होती. काय सांगावं, आज त्याना तिकीट मिळूनही जातील कदाचित. आणि मग ती बच्ची निश्चीत...निश्चीत हंसल्याशिवाय रहाणार नाही.

त्याचं मन घोकू लागलं. तारीला सिनेमा दाखवायचं राहून गेलं. या बच्चीला काहीही करून तिकीटं मिळायलाच पाहिजेत. मिळवून द्यायलाच पाहिजेत.

ताडकन् तो उठला. वेगानं खाली आला. 'लॅमींग्टन रोड' अजून पुढे होता. वहानांच्या अडथळ्याने बसचा वेग थोडा कमी होताच धावत्या बसमधूनच तो खाली उतरला. वेगाने उलट दिशेने चालत राहीला.

ऊंच पसरलेल्या दर्शनी भिंतीवर तट्ट फुगलेले दोन स्तन दिसले. नंतर त्या स्तनांवरचा चेहेरा लक्षात आला. 'अप्सरा!' तो थांबला. त्याचे डोळे मात्र सगळीकडे त्या दोघींना शोधूं लागले.

थिएटरवर 'हाऊस फुल्लचा' बोर्ड लागला होता. तिकीटं मिळालेले खुशीत होते. न मिळालेले अजूनहि आशेने रेंगाळत होते. पठाण आणि पोलीस अधून मधून गर्दी हाकलत होते. चेंगटपणाने तरीही काही तिथेच थांबले होते. काही तिथून हालले होते आणि ढकलल्यासारखे चालत चालत या समोरच्या फुटपाथवर येऊन पुनः थांबत होते. त्या दोघींना शोधत शोधत तोही या फुटपायवर येऊन उभा राहीला. त्याच्या दृष्टीला त्या काही पडल्या नाहीत.

तेवढ्यात या फूटपाथवर दबल्या आवाजात शब्द ऐकू यऊं लागले–

"वन् ऐटीवाला तीन रुपया....तीन रुपया."

एक आवाज त्याला पहेचानीचा वाटला. त्याने निरखून पाहीलं–

"पावलू–भोसडीके."

"आयला लक्ष्मणदादा? तुम भी आया. तिकीट मिला क्या? नहीं तो ये देख मेरे पास चार तिकीट है. भेंचोत आज भोत मजा आया. घूसके चार तिकीट मिलायाच. अभी तुम भी मिला. चलो दो तिकीट बेच देंगे. चाय पानी छूट जायगा?"

पुनः खालच्या आवाजांत ब्लॅक मार्केटचे दर पुकारायला पावलू वळत होता–तेवढ्यात त्याने त्याचं मानगुट पकडलं.

"चलं. ला इधर सब तिकीट."

पावलूने तिकीटं मुकाट त्याच्या हातात ठेवली. त्यापैकी एक त्याला वापस करून तो म्हणाला–

"तूं भाग अभी. सीधा थिएटरमे जाके बैठ."

"मिलकेच जायगा ना..."

आवाज चढवून तो म्हणाला

"तूं भाग बोला तो."

पावलूचा नाईलाज झाला. तो हालला. तरी जाता जाता म्हणाला–

"तुम आना लक्ष्मणदादा. भोत अच्छा पिक्चर है."

पुनः आजुबाजुला एक चक्कर काटून तो आला पण त्याला त्या कुठं दिसल्या नाहीत. आधीचा 'शो' सुद्धा आता सुटला आणि रस्त्यावर जास्तच गर्दी झाली. तो समजला. ही गर्दी बघून त्या केव्हाच निघून गेल्या. त्याचा जीव पुटपुटत राहीला. त्याच्या हातात तिकीटं होती. पण त्या कुठं नव्हत्या.

"वन् एटीवाला–थ्री फिफ्टी."

ब्लॅक मार्केटवाल्यांनी दर वाढवले होते. तो एकदम बोलून गेला.

"वन् एटीवाला सीर्फ वन् एटी."

त्या पोराकडचं गिऱ्हाईक फटकन् त्याच्याकडे वळलं. तिकीट





अनुक्रमणिका

घेऊन गेलं. जातांना थँक्स सुद्धा म्हणालं. पोरगा त्याच्याकडे धुमसत पहात राहीला.

"तेवढ्यात त्याच्या माठीमागे शब्द पालवले–

"आम्हाला देता कां दोन तिकीटं?"

चमकून त्याने वळून पाहीलं. तीच तरुण मुलगी तिच्या वहीणीसह उभी होती. त्याच्याकडे तिकीट मागत होती. त्याचा विश्वास बसेना. त्याने त्या लहान मुलीकडे पाहीलं. त्याच्या हातातल्या तिकीटाकडे ती पहात होती. तिचा चेहेरा कमालीचा कावराबावरा झाला होता. इतक्या जवळ तिला तिकीटं दिसत होती पण ती मिळताहेत कां नाहीं या शंकेनं ती व्याकूळली होती. त्याची सगळी धडपड सार्थकी लागण्याचा क्षण लपंडाव खेळत शेवटी असा येऊन ठेपला होता. तिकीटं दिली की क्षणांत इतक्या जवळ त्याला पुनः तारी दिसणार होती. . .त्याच्या काळजात एक लपकन् उष्ण लाट उठली.

"देतानं तिकीटं?"

त्या तरुण मुलीनं त्याच्या हातात पैसे देत पुनः विचारलं.

एकदम तो बोलून गेला.

"घ्याना. आणि पैसे नका देऊ. न्हाऊन द्यात."

सगळा जीव डोळ्यांत आणून त्या बच्चीकडे पहात पैसे आणि तिकीट त्याने त्या तरुण मुलीच्या हाती परत दिली आणि त्याच्या अपेक्षाप्रमाणे त्या बछडीचा चेहेरा हाललाही. . .

पण अचानक एकदम तिला हिसका बसला. तिकीटं त्याच्या अंगावर फेकली गेली. काय होतंय हे कळण्यापूर्वीच त्याला लहान मुलीला तरातरा ओढीत ती निघून गेली. जाताना पुटपुटली.

"मवाली मेला."

त्याच्या मस्तकात एकदम रक्त चढलं.

"अबे ए लवंडीऽऽ"

तो खूप जोराने ओरडला. पण आश्चर्य म्हणजे हे शब्द प्रत्यक्ष त्याच्या तोंडातून उमटलेच नाहींत. त्याच्या काळजातच ते पुनः पुनः मोठमोठ्याने उमटत राहीले. त्या बच्चीला ती घेऊन गेली त्या दिशेने पहात थरथरत तो उभा राहीला.

क्षणभराने काय घडलं ते आठवण्याचा त्याने पुनः प्रयत्न केला. . .आणि त्याला आता अस्पष्ट जाणवलं त्या तरुण पोरीला तिकीट आणि पैसे परत देताना तिच्या अंगाला कुठे तरी हात लागला.

त्याने आपल्याच कपाळाला हात लावला. गिऱ्हाईक शोधणारी टॅक्सी थांबवली.

पिक्चरवरून पावलू परतला तेव्हा तो जिन्याशी खाटल्यावर बसला होता. फका फका तोंडाने सिगरेटचा धूर फेकत होता. धूराला दारूचा वास येत होता. पायरीवर बसत पावलू म्हणाला–,

"आयला पिक्चर एकदम एवन् था लक्ष्मणदादा. तुम तो आयाच नहीं."

तो काहीच बोलला नाही.

"साला राजकपूरने सीनसीनरी भी क्या लिया है. .भेंचोद पुछो मत."

अजूनही तो गप्पच होता.

"सिगरेट तो दो लक्ष्मणदादा."

त्याने पाकीट पावलू समोर धरलं. ते चारमिनारचं होतं. त्याच्याकडून पाकीट घेताना पावलूला त्याचा हात खूपच गरम वाटला. सिगरेट पेटवत त्याने विचारलं–

"बिमार हो क्या लक्ष्मणदादा ?"

बिमार मैं नहीं पावलू. साली दुनीया बिमार है. उसकी माँ की. . ."

मग अंगांतल्या तापापेक्षा त्याचे शब्द अधिक फणफणत राहिले.

●●●

अनुक्रमणिका




रंगमंच—त्यावरची रंगलेली विविध
भूमिकांची वस्त्रें परिधान केलेली,
गानाभिनयकुशल माणसें
प्रेक्षकांना नेहमींच मोहवितात
पण भोब्यांना भेटलेली
ही 'आंतली' माणसेंही एका
वेगळ्याच जगांत
आपल्याला घेऊन जातील.
चला तर—
**"नाटक कंपनीच्या बिऱ्हाडी"**

—गोपालकृष्ण भोबे

**मध्यंतरी** दिल्लीहून नृत्य-नाटचें सादर करणारी एक फार मोठी संस्था मुंबईंत येऊन गेली. जवळ जवळ साठ ते पासष्ट कलावंताचा हा ताफा होता. त्यांचें रामायणांतील प्रसंगावर आधारित असें एक सुंदर नृत्यनाटय मी पाहिलें. या ताफ्यांत बहुतेक कलावंत पदवीधर होते; परंतु या ताफ्यांतील नजरेंत भरण्यासारखी मुख्य गोष्ट म्हणजे त्यांचें सांघिक सुघटित कार्य. यांतील रामाचें काम करणारें मुख्य पात्र आपला प्रवेश संपला कीं, नेपथ्याकडे लक्ष देत होतें; आणि मारुती आपलें काम संपलें कीं, रंगमंचावर मांडलेले वृक्ष व पर्वतादि वस्तु उचलून आणून आंत व्यवस्थित मांडून ठेवीत होता. पुढील प्रसंगाला लागणाऱ्या वस्तु विंगमध्यें तयार ठेवीत होता. कोणतेंहि पात्र रंगमंचावरील आपलें काम तात्पुरतें संपलें तशी पुढच्या प्रसंगाची वाट बघत पान चवळत बाकींच्याकडे तुच्छतेनें पाहात स्वस्थ बसून रहात नव्हतें. प्रत्येक काम आपलेंच आहे अशा जबाबदारीनें जो तो वागत होता.

चौकशी अंतीं कळलें कीं, संस्थेकडे असल्या कामासाठीं एकदेखील गडी नव्हता. संस्थेंतील प्रत्येक माणूस हा या संस्थेंतील एक घटक होता. मुख्य भूमिका करणारे ती भूमिका संपली कीं, आत्मकेंद्रित होऊं शकत नव्हते. गड्यापासून व्यवस्थापकापर्यंत सर्व भूमिका यांतील प्रत्येकजण करीत होता. परस्परांत कोणताहि दुजाभाव नव्हता.

मला 'नाट्य-निकेतन' या संस्थेची सुरुवातीच्या कालांतील तीव्र आठवण झाली. (नुकताच या संस्थेने आपला रौप्य महोत्सवी वाढदिवस साजरा केला.) सुरुवातीला या संस्थेनें असेंच सांघिक कार्य चालविलेलें होतें. परस्परांत दुजेपणा औषधालाहि नव्हता. सारें कांहीं आटोपशीर होतें. माणसें सुशिक्षित असल्याने एक निष्कपट वातावरण सर्वत्र वावरत होतें.

या संस्थेंतील माझीं पहिलीं दोन वर्षे आठवणींत राहावीं इतकी चांगलीं गेलीं; पण नंतरच्या पांच वर्षांत खुद्द या संस्थेंत आणि तत्कालांत पुनर्जीवित झालेल्या अन्य कांहीं संस्थांत नित्य घडणारे एक एक असें कांहीं प्रसंग मी पाहिले कीं, नाट्य संस्थेपेक्षां जनावरांची सर्कस अतिशय बरी असें वाटूं लागलें आणि नाटक कंपनीचे खरें स्वरूप कसें असतें याची कल्पना आली.

कांहीं माणसें मी अशीं पाहिलीं कीं, केवळ रंगभूमीपुरते कलागुण त्यांच्या अंगीं होते म्हणून त्यांना माणसें म्हणायचीं एवढेंच, पण तो गुण वगळला तर तीं माणसें नसून जनावरांहूनहि भयंकर होतीं. दुष्ट जनावरांत तरी एखादाच गुण वाईट असतो. तो माणसांना घातक म्हणून लोकसिद्धतेनें तें जनावर वाईट एवढेंच; पण इथें म्हणजे अनेक दुर्गुणांचा परिपाक झालेला. चोरी, लबाडी, विनाकारण अहंपणा, लोचटपणा, विघ्नसंतोषीपणा, लावालावी, फूटपाडी वृत्ति, हावरेपणा, दुस्वास इत्यादि दुर्गुणांची माळच असलेल्या माणसांतील प्रत्येकजण जात्या गळ्यांत घालून आल्यासारखा; आणि असा असूनहि वरून साळसूदपणाचा अभिनय चोख करणारा.

या सगळ्या गोष्टींचा अनुभव नाटक कंपनीचें बिऱ्हाड जेव्हां बाहेरगांवच्या दीर्घ मुक्कामावर असतें तेव्हां मिळत असतो. प्रत्येकांतील दुर्गुण या दीर्घ मुक्कामांत् 'शुक्लेंदुवत्' वाढीला लागतात. सोन्याच्या सांखळीची चोरी होऊन ती दुसऱ्याच दिवशीं चोर-

णाऱ्याच्या बोटावर जाडजूड आंगठीच्या रूपानें चढली तरी तिची वास्तपुस्त करतां येत नाहीं.

"काल तुम्हीं गांठीला वीष खायला पैसा नाहीं म्हणून रडत होतां लेको; आणि आज सगळयांना चहा व 'गोल्ड फ्लॅक' सिगारेट वांटण्याइतके पैसे तुमच्याजवळ कुठून आले ?" असा प्रश्न ज्याचें पाकीट चोरीला गेलेलें आहे तो माणूस त्या गोल्ड फ्लॅक सिगारेट वाटणाऱ्याला विचारूं शकत नाहीं. म्हणजे आळ घालण्याइतका पुरावा समक्ष दिसत असूनहि आळ घेतां येत नाहीं; आणि अपराधी समोर असून आरोप शाबित करतां येत नाहीं, असा तोंड दाबून बुक्क्यांचा मार सहन करावा लागतो.

हावरेपणा आणि खादाडपणा वीट येण्या इतका अनुभवास येऊं लागला तर कुणास कुणीं विचारणें हें अत्यंत मूर्खपणाचें. कारण विचारणाऱ्यांचें काळीज काढून ठेवणारें उत्तर असल्या माणसांच्या जिभेवर असतें. दुसऱ्याचें औषध चोरून पिणारे लोक तुम्हीं पाहिले आहेत काय ? मग नाटक कंपनींत असले होक होते. आतां दहा बारा माणसांना पुरेल एवढे पातेलेभर पिठलें एकटयाने होरपलेले पाहिले तर तुम्हीं काय म्हणाल ! ती क्रिया न बघवल्यानें तें तेवढें पिठलें खाणाऱ्याला तुम्हीं कांहीं तरी बोलाल; पण नाहीं हो ! तुम्हांला कांहीं बोलतां यावयाचें नाहीं.

'तें पिठलें तुमच्या खाजगी मालकीचें आहे काय ? नाहीं ना ? मग गप्प बसा ! एवढं खातां आणि तेवढं खातां असं विचारणारे तुम्हीं कोण ? आमच्या प्रकृतीची काळजी म्हणतां होय ? ती काळजी तुम्हांला नको ! अरे आयुष्य गेलं नाटक कंपनींत ! कानामागून आले आणि तिखट झाले ! आम्हीं खातों मालकाचें—हे विचारणारे कोण टिकोजीराव ?

झालें ? आतां बसा मुकाट. पुन्हां असल्या भानगडींत लक्ष घालूं नका.

परंतु कंपनीशीं संबंधित असलेल्या असल्या माणसांचा तापदायक असला तरी तो सहवास एकदां आंगवळणी पडल्यावर पत्करला म्हणतों मी; अन्य बाबतींत दुर्गुणी असलीं तरी कंपनीला सहाय्यभूत असा गुण असल्यानें नाटक कंपनींचीं तीं आधारस्तंभच असतात; पण त्यांहून जाचक होणारीं, इतर कामगारांना मस्तकशूळ उत्पन्न करणारीं, नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं दुर्दैवानें आणखीहि कांहीं माणसें येतात. तीं म्हणजे नाटकांत काम करणाऱ्या लहान मुलांच्याबरोबर किंवा तरुण हिरोइन बरोबर 'राखणदार' म्हणून हक्कानें येणारीं कधीं दोन किंवा तीन माणसें. हीं महाभयंकर ! नाटकांत किंवा कंपनींत यांना कांहींहि काम नसल्यानें मोकळया वेळांत मालकांची खुशामत करणें, कागाळया सांगणें, लावालावी करणें, आणि गांवांत नवे स्नेह जोडून कानगुपितें करणें असले जे यांचे उपद्व्याप चालतात त्यामुळें सारे वातावरण गढूळ होतें. कधीं कधीं संस्थेची चांगली घडीहि पार विसकटते. हें सारें कशामुळें घडतें, याचें खरें कारण संस्था चालकांना कळत नाहीं. खरी वस्तुस्थिति त्यांना सांगायला कुणी जात नाहीं; गैरसमज मात्र ब्रह्मराक्षसासारखे वाढत जातात.

मी अशा गोष्टी अनेक पाहिल्या. त्यांची आठवण झाली कीं, अंगावर कांटा उभा राहातो. आणि वाटतें—धन्य त्या पूर्वींच्या नाटक कंपनींच्या मालकांची कीं, ज्यांनीं अशीं अनेक माणसें बरोबर घेऊन वीस वीस पंचवीस पंचवीस वर्षें छातीचा कोट करून तो रथ ओढला; आणि आजच्या पिढीला रंगभूमीची शतसंवत्सरी साजरी करायचें भाग्य दिलें ! ते कंटाळले असते तर इतिहास निर्माण झाला नसता !

अमरावतीचा मुक्काम. सुगीच्या दिवसांत नाटक कंपनीनें तिथें जावें आणि वर्षाची ददात मिटवावी. एखादी पार्टी घेऊन 'पिकनिकला' जावें तसें अमरावतीला जावें आणि संतुष्ट मनानें परत यावें अशी पूर्वी तरी परिस्थिति होती. या मुक्कामांत संस्थेला अडचण झाली आणि ऐन वेळीं एका भूमिकेसाठीं कुणाच्यातरी वशिल्यानें एक लेकुरवाळी स्त्री कंपनींत आली. तिच्या लहान मुलीला (आणि त्या मुलीच्या आईलाहि !) सांभाळायच्या निमित्तानें अर्थातच बरोबर तिचा नवरा आला.

'नोकरीवरून रजा घेऊन आमच्या ह्यांना मुलीला संभाळायला कंपनींत यावें लागलें' असा उपकाराचा वहाणा ही स्त्री रोज करावयाची; परंतु खरें म्हणजे तिचे 'हे' कित्येक वर्षें खरोखरीचे बेकार होते आणि ही बाई नाटकांत बारीकसारीक कामें करून जेमतेम संसार चालवायची. ही गोष्ट त्या बाईच्या 'ह्यानीच' एकदां बोलण्याच्या ओघांत बेसावधपणें सांगून टाकली.

युद्धकाळ होता. गरजेच्या सर्व वस्तूंची चणचण होती; पण कंपनींत आल्यापासून त्या बाईनें, सर्व माणसांच्या नजरेंत जावें इतकें 'चरणें' अशा बेफामपणें चालू केलें कीं, सांगतां सोय नाहीं. आपल्याबरोबर आपल्या मुलीलाही ती नको नको म्हणत असतांना मारून, धाक दाखवून इतकें भरवायची कीं, ती मुलगी सकाळ, दुपार संध्याकाळ अपचन होऊन ओकायची.

तिची तक्रार तर रोजचीच—आमच्या ह्यांना नित्य सकाळीं 'आम्लेट' लागतें; हे दूध पितात, चहा पीत नाहींत; अमुक करतात आणि तमूक करतात....दुसऱ्याची अडचण या बाईनें कधींहि जाणून घेतली नाहीं. मिळेल तेवढा फायदा घ्यायचा हीच तिची वृत्ति; मग इतरांचें कांहींहि होवो. त्याची तिला तमा नव्हती. तिचे 'हे' मात्र आम्लेट खायचे, दूध प्यायचे आणि बाकिच्यांबरोबर अनवधानानें चहाहि प्यायचे !

याच मुक्कामांत झालें काय कीं, एकाएकीं, स्वैंपाकी पडला आजारी. कंपनींतल्या नटवर्गांनीं व गडीमाणसांनीं कंबरा कसून सारें कांहीं निस्तारलें; पण ही बाई आपल्या खोलींतून बाहेरदेखील आली नाहीं. जेवायच्या वेळीं मात्र येऊन सहकुटुंब पानावर बसायची. जीव जळफळला पण अशा आप्पलपोटया स्त्रीला बोलणार कोण ? साध्वीपणाचा आव तर असा आणायची कीं, प्रातःस्मरणीय अशा पंच पतिव्रता हिच्यासमोर झक मारतात.

मुक्काम संपला तशी बाई लव्याजम्यासकट गांवाला निघून गेली; पण तिनें बाहेर गेल्यानंतर 'कंपनीनें आपली चांगली सोय केली नाहीं' अशी निंदा केलेली कानावर आली. आणि ती ऐकल्यानंतर







बाकिच्यांनीं तोंडांत बोटें घालून आश्चर्य व्यक्त करण्या-पलीकडे कांहीं केलें नाहीं; पण तिनें निंदा केलेली बातमी सांगणाऱ्यानें पुढें खाजगींत असेंहि सांगितलें कीं, या साध्वीने आपला पहिला नवरा सोडलेला होता. आणि सध्याचे तिचे 'हे' म्हणजे कुणी कायदेशीर 'हे' नव्हते. आपले असेच होतें. बातमींतला हा कळसाचा भाग ऐकल्यानंतर मात्र माझे डोळे दोन मिनिटें विस्फारले.

नाटक कंपनींत राहावयाचें म्हणजे डोळे असून पाहायाचें नाहीं, कान असून ऐकायचें नाहीं व तोंड असून बोलायचें नाहीं; अशी वृत्ति अंगांत बाणवावी लागते. तरच होतकरू माणसाचा तरणोपाय असतो. नाटकांत एक लहान मुलगी काम करीत होती. तिचे आई वडील नेहेमीं तिच्याबरोबर असायचे. बाप त्यांतल्या त्यांत थोडा समंजस. कोण-त्याहि परिस्थितींत जमवून घेणारा; पण तिची आई म्हणजे एक गाळीव अर्क होतें. कपडे धुणें हा एक त्या बाईचा आवडता छंद. आधल्या रात्रीं नाटक संपवून माणसें जागरणाचीं झोपलेलीं आहेत, त्यांना त्रास होईल हा विचारहि तिच्या मनाला शिवत नसे. सकाळीं ६ वाजल्यापासून कपड्यांचे पिळे मोरीच्या फरशीवर आपटल्यानंतर होणारे आवाज ऐकून, तिथें एखाद्या धोब्याचें बिऱ्हाड राहात असावें अशी कल्पना त्रयस्थाला होणें स्वाभाविक होतें.

कंपनींतल्या गड्यांना आपलेसें करण्याचें या बाईचें एक ठरीव तंत्र होतें. एखादा गडी भेटला कीं, त्याला आपादमस्तक न्याहाळीत पाल चुकचुकावी तशी चुकचुकत ती म्हणायची "किती काम करतोस रे तूं ! तब्येत बघ कशी कांट्यासारखी झाली आहे ती. आधीं प्रकृति सांभाळली पाहिजे ! असं करून कसं चालेल ? काम काय रोजचं असतं. काम करवून घेणारे खरपूस करून घेतील. पण तुझ्या तब्येतीकडे कोण लक्ष देणार बाबा ?"

तिची ही गोळी बरोबर लागू पडे. त्या अशिक्षित गड्याला ती आपली हितकर्ती वाटे. आणि तो बिचारा आपली सर्व परिस्थिति तिला सांगून तिच्यापुढें अगदीं गोगलगाय बने. कांहीं दिवसांनीं तो गडी कंपनीचा कीं, त्या बाईनें खाजगी कामाकरितां ठेवलेला, याची भ्रांत सर्वांना पडे; पण कुणी कांहीं बोलत नसत. कारण मालकां-पासून स्वैंपाक्यापर्यंत सर्वांच्याच प्रकृतीसंबंधीं चुकचुकून तिनें आपलें काळजीवाहू जाळें व्यवस्थित पसरलेलें असे. या भानगडींत तिनें स्वहित कसें साधलेलें आहे, लावालावी किती केलेली आहे, या गोष्टी उघडकीला येईपर्यंत किंवा तसा स्फोट होईपर्यंत कुणालाहि कळत नसे.

तिच्या लाघवी स्वभावानें तिनें मलईदार तेवढें स्वतःसाठीं घ्यावयाचें. कंपनीच्या दुधावरची मलई भुरकून शिवाय स्वतःची व मुलीची कांति तकतकीत व्हावी म्हणून ती मलई अंगाला देखील चोळायची. वास्तविक इतक्या लोकांना लागणाऱ्या दहा पंधरा शेर दुधाच्या साईचें विरजण लावण्यास कामीं आलें असतें. तशी चौफेर दृष्टि असलेला एखादा कुणी जाणता चौकशी करीहि; पण दुधांत पाण्याचें प्रमाण खूप असल्यानें मलई येतच नाहीं असें स्वैंपाकी खुशाल सांगायचा; परंतु पुढें झालें काय कीं, तिच्यापेक्षां सवाई लाघवी अशी दुसरी एक बाई आपल्या लेकरासहित कंपनींत आली. आणि तिनें या पहिलीचें मायाजाळ फाडून टाकलें. पहिलीला ती जिकडे तिकडे कावळ्याच्या नजरेनें पाण्यांत पाहूं लागली. तिच्या प्रत्येक कृतीवर नजर ठेवूं लागली. पहिलीला मग सढळपणें साईला हात लावतां येईना. संधि साधून हात मारल्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. त्यामुळें दूध खराब होऊं लागलें. लोकांच्या सकाळच्या चहाची धांदल होऊं लागली. पण पहिलीचें सुदैव असें कीं, मालकापासून गड्यापर्यंत तिची शंका कुणीहि घेईना.

अखेरीस आपल्या लाघवी स्वभावानें तिनें एकदा खुद्द कंपनीच्या मालकांना एका घरेलु कज्जांत हां हां म्हणतां गोवलें आणि तें निस्तरतां निस्तरतां मालकांच्या नाकीं नऊ आले. तेव्हां कुठे तिच्या लाघवीपणाचा बुरखा फाटला गेला.

* * *

छिनालपणानें वागणारी अभिनेत्री एखाद्या नाट्यसंस्थेंत शिरणें हा त्या नाट्यसंस्थेला एक मोठा शाप होय. ही कीड सबंध संस्था नाना प्रकारांनीं पोखरते. कुटुंब पद्धतीनें बाहेरगावीं राहाणाऱ्या संस्थेला असल्या स्त्रीपासून फार मोठा धोका असतो. चित्र विचित्र मित्र-मैत्रिणींचा घोळका घेऊन ही स्त्री वेळीं अवेळीं संस्थेच्या बिऱ्हाडीं प्रवेश करते. आपल्या हैदोसानें ती तिथल्या चांगल्या वातावरणाचा चुथडा करते. जशी नाटकांत तशीच ती एरवींदेखील वागत असते.









अशाच एका स्त्रीनें कै. व्ही. डी. पंडितांवर एक वांका प्रसंग आणला. पंडित दम्यानें नेहमी पिडलेले असायचे. त्यांतून संस्थेचें बिऱ्हाड बाहेरगांवीं असलें कीं, इतर सर्व माणसें गांव पाहावयाच्या किंवा अन्य निमित्तानें इतस्ततः विखुरलेलीं असतांना पंडितांना बिचाऱ्यांना मात्र बिऱ्हाडीं पडून रोहावें लागत असे. एका मुक्कामांत ही स्त्री सकाळींच आपल्या एका समानशील मैत्रिणीला घेऊन आली. ही तिची मैत्रिण स्वतःच्या घटस्फोटाच्या खटल्यांत जाहीर रीतीनें नुकतीच गाजली होती; पण आपण एखादें फार मोठें सत्कार्य केल्यासारखें उजळ माथ्यानें वावरत होती.

सकाळीं दहाच्या सुमारास ही बाई जी बाथरूममध्यें गेली ती दीड तास झाला तरी बाहेर येईना. पंडितांचें अजून सर्व कांहीं आटपावयाचें होतें. दर पंधरा मिनिटांनीं ते पंचा खांद्यावर घेऊन बाथरूम रिकामी आहे काय पाहून यायचे, आणि मुकाट्यानें आपल्या खाटेवर बसायचे. शेवटीं कंटाळून त्यांनीं कडी वाजवली. तशी ती बाई बिळांतून नागीण बाहेर आल्यासारखी बाथरूममधून उसळून बाहेर येऊन पंडितांना अद्वातद्वा बोलूं लागली. आणि निर्लज्जपणें म्हणाली, "तुम्हांला मेला आंघोळ करतांना उघडी पाहायची होती, म्हणून तुम्हीं मोरीचा दरवाजा उघडायचा प्रयत्न केलांत !"

आधींच दम्यानें पिडलेले पंडित बिचारे या अकल्पित प्रसंगानें कावरेबावरे झाले. त्यांचे हातपाय कांपायला लागले. ते कापऱ्या आवाजांत म्हणाले, "नाहीं हो माझ्या हातून असलं पाप कधींहि घडणार नाहीं. माझ्याबद्दल संस्थेतलं कुणीहि माणूस निर्वाळा देईल !" असें म्हणून स्वतःला सांवरीत ते आंत येऊन सुन्नपणें बसले.

इतक्यांत नाटकांत काम करणारी ती बाई आपल्या मैत्रिणीचा कैवार घ्यायला तरातरा आंत आली आणि पंडितांना तिनें चक्क 'बेशरम' अशी शिवी हांसडली. माझा राग विकोपाला गेला. आणि पंडितांची बाजू घेऊन मी त्या दोघांवरहि तुटून पडलों. 'कंपनीच्या बिऱ्हाडीं तूं एक परकी बाई आंघोळीला कां आलीस ?' या माझ्या पहिल्या प्रश्नानें ती बाई निरुत्तर झाली. आणि मी तिच्या वर्माला हात घालून तिला वेसवा असें म्हणतांच तिची नांगी ठेचली गेली. दोघींहि रडून तक्रार नोंदायला मालकांकडे गेल्या, पण पुढें मालकांनीं मला एका शब्दानें देखील न विचारल्यानें ही गोष्ट गुलदस्तांत राहिली. ती आज उघडकीला आणून नाट्य संस्थेच्या बिऱ्हाडाला अशा स्त्रियांमुळें होणारा उपसर्ग व त्या निमित्तानें कै. पंडितांचाहि निष्कलंकपणा सांगण्याचें ऋण मी फेडीत आहे.

अशा किती म्हणून गोष्टी सांगाव्या ! नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं राहाणाऱ्यांजवळ असल्या गोष्टींची पोतडी फुगलेली असेल. या विषयाला आयुष्य वाहून घेतलेल्यांना असल्या गोष्टींना नित्य तोंड द्यावें लागतें. कुणीं सांगतात, कुणी संवयीनें कानाडोळा करतात. आपलेच दांत व आपलेच ओठ म्हणून गप्प राहातात. मालकांना संस्था जिवंत ठेवावयाची असते. त्यांना असल्या गोष्टींकडे लक्ष देऊन चालत नाहीं. आणि लक्ष म्हणून किती देणार ? प्रत्येक डाग धुवून पुसून काढण्यासाठीं साबण व टॉवेल घेऊन हिंडण्यांत कंपनीचा मालक वेळ काढायला लागला, तर नाट्य-संस्था चालविणें अतिशय जिकिरीचें होऊन जाईल. किंवा नाट्यसंस्था बंद करून त्याला एखादी लॉंड्री काढावी लागेल ! हें मला दीर्घ कालानंतर कळलें. आणि तें कै. पंडितांनीं मला पटवून दिलें.

कंपनीची अब्रू विनाकारण वेशीवर टांगणारेहि कांहीं उपद्रवी दुय्यम नट असतात. बाहेरगांवीं हीं असलीं माणसें 'आपली भूमिका आहे म्हणून कंपनी चालली आहे' अशा फुशारक्या मारीत हिंडतात. सामान्य माणसें तें खरें समजतात. त्यांच्या अंगावर उंची सूट असतो. आपण पदवीधर असल्याचें ते सांगतात. उंची सिगारेट्स ओढतात. त्यांचें चहा पिणें मोठ्या हॉटेलांतून असतें. केवळ हौस म्हणून नाटकांत काम करीत असल्याचें ते सांगतात. लोकांत आपला दबदबा निर्माण झाल्यानंतर कंपनीनें पगाराचे पैसे वेळींच दिले असतांना पगार झालाच नाहीं असें सांगून या नव्या ओळखीच्या लोकांकडून उसने म्हणून पैसे उकळतात. मी कंपनींत असतांना एकानें असें गुपचुप बरेंच देणें केलें आणि अखेरीस त्याला तें आवरेनासें झाल्यावर बुडबुडा फुटला. नाइलाजानें कंपनीनें त्याला नोटीस दिली; व मागाहून खोट्यानाट्या गोष्टी सांगून त्यानें संस्थेची बदनामी केली.

आपल्या खाजगी भांडणाचा सूड रंगमंचावर उगविणारीं माणसेंहि अशींच भयंकर. हे हट्टी लोक प्रसंगीं संस्थेची इभ्रत किंवा आपली जबाबदारी ओळखत नाहींत. प्रत्यक्ष प्रयोगांत दुसऱ्याचा तेजोभंग करणें हें ते सहजपणें करतात. अशा कृत्यानें नाटकाचा

चुथडा होतो याकडे त्यांचें कधींहि लक्ष नसतें. कमरेचें सोडून डोक्याला बांधायला ही माणसें सदैव तयार. ज्या संस्थेंत आपण काम करतों त्या संस्थेच्या बऱ्या वाईटाची काळजी त्यांना मुळींच नसते. बाकीचे खड्डयांत जावोत ही त्यांची भाषा. त्यांचें काळीजहि फत्तराचें. नाट्य-संस्थेच्या दुर्दैवानें अशीं माणसें मिळाली तर त्या संस्थेचे तीन तेरा व्हायला वेळ लागत नाहीं. तसें झालेलेहि इतिहास साक्ष देईल. अशा स्वभावाचा एक नट मला पाहायला मिळाला. हल्ली कोल्हापूरच्या रस्त्यांत तो कुठेंतरी उद्‌वत्त्या विकतो. नियतीनें त्याला दारुण शिक्षा केली.

सात वर्षांच्या काळांत मला नाटक कंपनींत दिसलेल्या नमुनेदार माणसांपैकीं कांहीं दुर्गुणी माणसांची ही झलक सांगितली. पण त्याचबरोबर नाट्य संस्थेला प्रतिष्ठा आणणारी माणसेंहि आढळलीं. कै. व्ही. डी. पंडित, कै. श्रीमती बाळाबाई पेडणेकर, श्री. श्रीनिवास जोशी, सौ. ज्योत्स्नाबाई भोळे, श्री. पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे या सज्जनांनीं नाटक कंपनींतला माझ्या आयुष्यांतला काल अतिशय सुसह्य केला. अनेक गोष्टींची मला शिकवण दिली. या सृष्टींत भांबावून गेलेला मी पुष्कळ धीट झालो. बरेंचसें कांहीं शिकलों.

पंडित बुद्धिमान होते. व्यासंगी होते. बरें वाईट आयुष्य त्यांनीं पाहिलेलें होतें. कलासृष्टीच्या विविध दालनांतून त्यांनीं प्रवास केलेला होता. खदखदून हांसविणाऱ्या त्यांच्या विनोदी स्वभावाला स्वानुभवांची जोड होती. उधळलेल्या संसारामुळें त्यांत कारुण्याची धार होती. या गुणी कलावंताचा दम्यासारख्या रोगानें पाठपुरावा केला आणि त्यांना अकालीं म्हातारें केलें. टीचभर भूमिकेंतदेखील प्राण ओतणारा आणि तीवर स्वतःचा कायम ठसा ठेवणारा असा प्रतिष्ठित नकलाकार कलावंत विरळा.

पुरुषोत्तम देशपांडे म्हणजे चैतन्याचा अखंड झरा. 'पानी तेरा-रंग कैसा। जिसमें मिलावें वैसा' असें त्यांचें वर्तन. ते असेपर्यंत त्यांच्या सहवासाचा कुणालाच कधींहि कंटाळा आला नाहीं. देशपांडयांनीं सर्वांनाच सदैव आनंद दिला.


हेंचि काय फळ मम तपाला....

बाळाबाई पेडणेकर ही माउलीहि अशीच. जबाबदारीच्या भूमिका करूनहि कधींहि कुरकुर न करणारी. कोणत्याहि परिस्थितींत समाधानांत राहणारी आणि, सर्वांशीं निष्कपट वृत्तीनें गोड गोड वागणारी. अशी स्त्री मी पुन्हा नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं पाहिली नाहीं. ती होती तोंपर्यंत कंपनींतील कुणाहि माणसाला निर्व्याज ममतेची उणीव भासली नाहीं. बाळाबाईंची स्वतःची नाटक कंपनी होती. नाटक कंपनीच्या अडीअडचणी कोणत्या असतात या त्यांना अवगत होत्या. माणसांचीं मनें त्यांना कळत होतीं; पण असें असलें तरी त्यांची वृत्ति निरागस होती. व भूमिकेंत असतांना रंगभूमीवर कोसळून प्राण जाईपर्यंत ती तशीच राहिली. बाळाबाई गेली आणि तिची जागा घेणारी स्त्री कंपनींत शेवटपर्यंत आली नाहीं.

कंपनीचा सारा भरिभार मुख्य भूमिका करणाऱ्या सौ. ज्योत्स्नाबाईंवर होता. माझ्या अल्पबुद्धीला अजूनहि तसें वाटतें. आपल्या कामाव्यतिरिक्त इतर फालतू चर्वणांत या बाईनें कधींहि भाग घेतला नाहीं. जें त्याज्य होतें त्याकडे त्यांनीं कटाक्षानें दुर्लक्ष केले. इतरांच्या दुर्गुणाकडे चिकित्सेनें न पाहातां जेणेंकरून कंपनींतील सुरेख कौटुंबिक वातावरणांत भर पडेल असेंच या बाईचें वागणें होतें. विभिन्न स्वभावाचीं माणसें एकत्र आलीं कीं, भांड्याला भांडें आदळून मनाचा प्रक्षोभ होणाऱ्या घटना नेहेमींच निर्माण होतात. पण स्वाभिमान बाजूला ठेवून ज्योत्स्नाबाईंनी सदैव नमतें घेतलें. मी असतांना कंपनीचीं बहुतेक नाटकें त्यांच्यावरच अवलंबून होतीं; किंबहुना त्यांच्याशिवाय तीं नाटकें चालूंच शकली नसतीं. परंतु अहंकाराचा वारा या बाईच्या अंगावरून कधींहि गेला नाहीं. कसल्याहि प्राप्त परिस्थितींत त्यांनीं हंसतमुखानें दिवस काढले. भूमिकेंत नेसायच्या साड्यांना इस्त्री करायला विसरला म्हणून कपडे पटांतील माणसाशीं आकाश कोसळल्यासारखी हुज्जत घालून नाटक बंद पाडण्यापर्यंत मजल गांठणाऱ्या अभिनेत्याहि मागाहून या नाट्यसंस्थेंत आल्या; आणि संस्थेंतील इतरांना त्यांनीं आपल्या वागण्यानें 'दे माय धरणी ठाय' करून सोडले परंतु गानाभिनयांत एक विशिष्ट कालपर्यंत 'एकमेवाद्वितीय' असूनही व लोकप्रियतेच्या शिखरावर राहूनहि ज्योत्स्नाबाईंनी असला उन्मत्तपणा कधींहि केला नाहीं आणि केवळ निमित्तमात्र अशीच वृत्ति शेवटपर्यंत ठेवली; व मी ती पाहिली.

कांहीं नामवंत संगीत दिग्दर्शकांचा सहवास आणि त्यांच्या प्रतिभेचें दर्शन या संस्थेंत मला अनायासें घडलें. श्री. केशवरावजी भोळे, श्री. दत्तोपंत कोरगांवकर, श्रीधर पार्सेकर आणि वासुदेव भाटकर यांचा कल्पनाविलास व संगीत दिग्दर्शन कौशल्य मला प्रत्यक्ष पाहायला मिळालें. पैकीं पार्सेकर व भाटकर माझे समवयस्क असल्यानें निकट परिचयामुळें माझ्या माहितींत खूप भर पडली. केशवरावजींनीं अत्यंत आपुलकीनें आयुष्याला मार्गदर्शक असें पुष्कळ वेळां सांगितलें. अजून सांगताहेत. चांगल्याचें मनापासून कौतुक करणारा व प्रसंगीं कठोर आदेशानें ताळ्यावर आणणारा असा पितृतुल्य स्नेहि पूर्वसुकृतानें लाभावा! शेवटीं राहिलें माझ्या कंपनीच्या मालकासंबंधींचें सांगणें.

त्यांच्या स्वभावाचा थांग मला अजून लागलेला नाहीं ! ज्यांना तो लागला तीं कांहीं तरी विशेष माणसें असतील असें मी समजतों.

●●●







अनुक्रमणिका

**नगाधिराज हिमालयाचे आव्हान स्वीकारून गिर्यारोहणाचा विक्रम करणाऱ्या एका साहसी महाराष्ट्र कन्येच्या आत्मकथनाचा रोमांचकारी उत्तरार्ध--**

**—कु. सुधा शांताराम नेरुरकर**




**सोनाम्** अबोल तर आंगफुता बोलका. 'ओ जो' या त्याच्या पेटंट शब्दांनी त्याची बोलघेवडी वाणी जी गोष्ट सुरू करायची ती अनेक हावभाव करीत पूर्ण व्हावयाची. त्यांतील निम्मे-अधिक डोक्यावरूनच जाई म्हणा माझ्या! आम्ह दोघांचे हिंदी छटाक-नवट काच्या मापांचे! सोनाम्सारखा आंगफुता सावलीसारखा पाठी राहावयाचा चालताना. सोनाम् सावता माळ्यासारखा तर आंगफुता गोरा कुंभारासारखा!

आंगफुता उंचीने छोटासाच, पण शरीराने भरलेला. शेर्पा-जातीचे विशिष्ट नाक-डोळे असलेला. मला प्रथम "मेमसाब" म्हणावयाचा. एक दोनदा त्याची ह क ऐकल्यावर मी समजावयाची की तो मिसेस जॉयीस धनशी ना हाक मारतो आहे व दुर्लक्ष करावयाची. माझ्या लक्षात आल्यावर मी त्याला सांगितले, "बाबा रे, मी तुझी दीदी; समज ं? मी तुला "आंगफुता–दाजू" म्हणणार आणि तू मला सुधा-दीदी म्हणावयाचं."

आंगफुताला बोलावयास काहीही चालते. त्याच्या चौदा महिन्यांच्या तान्ह्या मींगमारपासून चीनी आक्रमणापर्यंत. त्याच्या बोलण्यात जोश काही वेगळाच आहे. त्याची मते ठरलेली असतात. ताश सरदार त्याचा जीवाचा कलिजा आहे. बाकी आंगफुताच्या जीवाच्या अशा कितीतरी गोष्टी आहेत म्हणा! लहान मुलासारखे त्याचे अशिक्षित पण अति संवेदनाक्षम मन सारे टिपून घेते, कुतूहलाने बघते, न्याहाळते, स्वतः अनुभवते, आवडले तर 'अच्छा है' म्हणून जवळ करते, नसल्यास 'पसंद नहीं' म्हणून नाकारते. सारे कसे रोकठोक! ज्याला आपला म्हटला त्याला जीवाच्या मोलाने जपणारा! आपला नसलेला त्याच्या दृष्टीने मेलेला!

माझे इतर दाजू स्वतः बाबतीत फार कमी बोलणारे व इतरही गोष्टीत स्वतः होऊन कधीच न भाग घेणारे.

त्यांच्यापेक्षा आंगफुता किती वेगळा वाटायचा! इतर दाजूंवर प्रश्नांची सरबत्ती करून मी त्यांची व कुटुंबियांची माहिती विचारी. आंगफुताचे त े नाही. त्याच्याकडे आडपडदा नाही. अगदी लहान वयात त्याचे आई-वडील वारले. तो मोठा. पाठी एक भाऊ व एक बहिण. तोच त्यांची आई झाला. दारिद्र्यात त्याने आपले पोरके कुटुंब पोसले. वाढवले. वयात आलेल्या बहिणीला मार्गाला लावि े. भावाला पोटापाण्याचा धंदा काढून दिला. मग स्वतःचा संसार उभारला. 'तू माझा पहाडातला कडूनिंब आहेस' मी त्याला गहिवरून म्हणाले. त्याला माझे शब्द कळले नाहीत पण भाव उमजला. मग बहिणीने त्याचा मान न राखल्यामुळे त्याने रागाच्या भरात तिच्या मुस्कटात कशी लगावली ही 'कॉनफिडेंशल' गोष्ट त्याने मला ऐकवली. ती ऐकताना बलराम-दादाची आठवण झाली मला!

असा हा निष्कपट, कोपिष्ट आणि गप्पिष्ट आंगफुता अस्सल मावळ्याच्या इमानाने पर्वतरोहणाच्या आधीच्या कित्येक मोहिमांत साब-लोकांचा कलिजा बनून गेला आहे. घड्याळ कॅमेरासारख्या








## पाठीवरती घेउनि ओझें निघे जिंकण्या तो हिमगिरीवर

दुर्गा, खुर्शीद व शेरपा संगबू [दि. १७-१०-१९६४]

मूल्यवान बक्षिसांनी त्या साब लोकांनी आंगफुताच्या गुणांची कदर केली आहे. त्या वस्तु घरी कारभारीणीकडे दार्जिलिंगला. करायची काय ती जोखीम प्रवासांत !' असे त्याचे मत.

चालताना आंगफुताची तोंडाने टकळी चालूच असायची. पण नजर चौफेर फिरायची. थवकायची. वाट खराब असेल तर Ice-axe ने लागलीच रस्ता कर. काटेरी झुडपं तोडून टाक वगैरे उद्योग अव्याहत चालत. मागून येणाऱ्यांना नको त्रास व्हायला म्हणून हा नेहमीच काळजी घेई. त्यात भरीस भर म्हणून डोंगरकडयावरील नाना वनस्पति-मुळ्या उपटून त्यांचे परीक्षण करील. हुंगून जवळ बाळगील नाहीं तर फेकून देईल. का घेतली आणि का टाकली ह्याचे न विचारताच स्पष्टीकरण देईल !

'दिदी, ही मुळी बघा. रंग कसा लालबुंद आहे ! आमचे लामा लोक पूजा करताना वापरतात. घेतो बरोबर.' किंवा, 'हे झुडुप मी का उपटलंय माहित आहे? मोठं विषारी झाड. एव्हढा तुकडा चघळलांत तर एका मिनिटात माणूस पार खतम्!' 'ह्या बघा लसुणाच्या पाती ! आता अशी मस्त झणझणीत चटणी बनवतो पडाव आल्यावर !'

मग कँपवर रात्री हटकून थाळीत पडायची आंगफुताची "पेशल" चटणी !

बर्फावरील बूटांच्या ठशाकडे पाहून तो थांबून म्हणायचा, "ह्या बाजूने मेम-साब गेल्या. त्यांचा इंग्रजी-बूट पहा कसा वेगळा आहे आपल्या बूटांहून ! आणि हे छोटे ठसे माहीत आहेत का कुणाचे ? जनावर गेलंय."

मात्र कधी कधी असे व्हायचे की, बोलका पोपट मूकही व्हायचा. विमनस्कपणे सिगरेटचे झुरके घेत चालायचा. बहुधा घरची आठवण त्याला बेचैन करी. त्या डोंगरात चिठ्या-चपाट्या कुठल्या वेळेवर हाती यायला ? न बोलताच थोडावेळ आम्ही यांत्रिकपणे चालत राहूं. त्याची साथ कमी पडली की मला कंटाळा यावयाचा. चालून चालून पाय तुटले तरी मुक्कामाचा पत्ता न ही हे जाणवे. उन्हाचा तापही वाढे. आणि कसे कोण जाणे. दोघानाही एकदम मोठासा फत्तर किंवा सावलीचा वृक्ष दिसायचा. बरोबरचे इतर दाजू किंवा मजूर दिसत. आणि मग तिथे जाऊन आम्ही आमचे बोजे टाकून देत असूं. थर्मास काढून गरमागरम चहाचा घोट घेऊन पुन्हा ताजेतवाने होऊन पुढे चालावयास लागत असू ते ठिकाण येईपर्यंत !

कँपवर आल्यावर आधी थाग्पा-गॅलबोला आपली कमाई आंगफुता दाखवत असे. कारण थाग्पा-दाजू त्याच्यासारखाच वनस्पति-शास्त्रज्ञ ! नादिष्ट ! पस्तीशीच्या घरांतला गॅलबो-दाजू जाणता आणि शिकलेला आहे. महिलांच्या पर्वतरोहणाच्या कामगिरीत दुसऱ्यांदा भाग घेतला आहे त्याने. अमेरिकन् मेमसाहेबाबरोबर आणि आता आमच्याबरोबर. गेल्याच एप्रिल-मे-मध्ये नंदादेवीच्या मोहिमेत तो इथल्या भागातून फिरला होता. साहजिकच गलॅबो आमचा वाटाड्या.

त्याच्याबरोबर चालताना तो हमेश सभोवतालच्या पर्वतराजींकडे आमचे लक्ष वेधून घ्यायचा. त्यांची माहिती द्यावयाचा. शिखरांची नांवे सांगायचा. 'धरानसी' या आमच्या बेसकँपच्या वाटेवरील मुक्काम नं. ३ ठिकाणापासून पर्वतांच्या कॉलनीच जणु सुरू झाल्या ! आपल्या दादर-माटुंग्याच्या हिंदु-कॉलनी, पारसी-कॉलनी पासून महाराष्ट्र गृह-मंडळाने निर्मिलेल्या गाळा-टाईप कॉलनीसारख्या आंखीव, रेखीव आणि मोजून मापून !

मला मात्र सर्व पर्वत एकसारखे दिसत ! दुरून त्या हिमधवलांच्या राशींकडे बघताना मला पांढऱ्याशुभ्र बगळ्यांचा काफला आठवावयाचा. काय डौल असतो बेटच्यांच्या त्या संथ-लयीतील विहरण्यात !

गॅलबो-दाजूची नामावली या कानातून त्या कानावाटे जावयाची. मी भान हरपून आपली गिरिराजांच्या कौतुकात बुडलेली असावयाची. माझी स्थिति पाहून मग तो जाणता शेर्पा मला विनोदाने म्हणावयाचा, "अभी तो कुछ नहीं। खूब चलना है। और चढना है यह सऽब देखनेको। चलो, दिदी चलो। पीछे रह गये हम।"

बाकी गॅलबोचे हिंदी-ज्ञान माझ्या 'बंबईका हिंदी'शी एकदम मॅच होणारे ! म्हणून बोलणे—चालणे पुष्कळच समजुतीने होई! ! विशेष म्हणजे त्याला इंग्रजीहि येते बरेचसे. आमच्या जॉयीस धनशीथ मेमसाहेबांचा तर गॅलबो-दाजू उजवा हात ! दोघांचे भाषण ऐकताना मला पुष्कळदा हसू आवरणे मुष्कील होई. एकमेकाना मनातील आशय स्पष्ट करून सांगताना त्या दोघांच्या कपाळावर काळजीने आठ्या आकसत, नाकपुड्या व्यग्र होत, ओठाचा चंबू होई, डोळ्यात "समजलं ?" हा भाव उमटे. आणि त्या दोघांची इंग्रजी-भाषेवरील कसरत पाहताना हटकून करमणूक व्हायची आमची !



अनुक्रमणिका



गॅलवो-दाजू सर्वत्र असतो. ताशी-सरदारचा डेप्युटि-चीफ जणू ! सबंध दिवस जीवाचा आटापिटा करून गॅलवो शेकोटीच्या ऊबेत, ताशीच्या जवळ सरकतो. त्याच्या चार-इंची ॲल्युमिनियमच्या डबीतील तपकीरीची मैत्रीच्या सलगीने चिमुटभर मागणी करतो. एक दोनदा शिंकतो. आणि पाय पसरून पालापाचोळयातच आरामात पहुडतो. मग त्याची तंद्री लागते. त्याच्या घोगऱ्या आवाजात पहाडी-गीताची एखादी धून तो हलकेच घोळवतो. क्वचित् त्याचा सूर मोठा होतो. लाजऱ्या सोनाम्ला तो बरोबर पकडता येतो. त्या दोघांच्या सुरात ताशी-छुन्झेन आपला गळा मिसळतात. आंगफुताहि सामील होतो आणि उत्स्फूर्त पहाडी गाण्याने आमचा पडाव भरून जातो. रंग येतो. लय वाढते आम्ही देखील शिकलेली नेपाळी गाणी गातो. 'एकांछा मलई सुनको तारा' पासून जनानी गळा मर्दानी सूरात मिसळला जातो व शेकोटीत लाकडांची भर पडत जाते. थंडीचा कडाका उबेत लपटला जातो. मध्येच कुणीतरी उठून गरमागरम ओव्हलटिन मग्-मध्ये ओतून हाती देतो. असाच किती तरी वेळ आनंदात निघून जातो आणि गॅलबो-दाजू भानावर येऊन म्हणतो, 'बहुत टाइम हुवा ! कल जल्दी उठना है !'

उठावयास कितीहि उशीर झाला तरीही गॅलबो-दाजूची सकाळची साग्रसंगीत देवपूजा चुकणार नाही. दगडावर दगड रचून तो त्या लोकांची विशिष्ट देवपूजेची तयारी करील. चालताना उपटलेल्या धुपांच्या जुडया त्यावर ठेवील. प्रार्थना करील.

देवपूजेबरोबर अंधश्रद्धा त्याच्या हाडीमासी खिळली आहे. औषधी मुळयांबरोबर इतरही जडीबुटीची त्याची जंत्री मोठी आहे. ही भूत-जुडी. जवळ ठेविली तर काय बिशाद आहे पिछा करावयाची बेटयाची ! ही ठाम कल्पना. माझ्याकडे एक भूत-जुडी आहे त्याने दिलेली. हीच भूत-जुडी त्याने "दिब्रुगेटा" (११,४८० फूट) कॅंपवर आम्हा सर्व मुलींच्या तंबूभोवती पसरली होती. कारण तसेच होते. १९५६ साली मृगथुनी-मोहिमेत इथंच चकरबोटी मृत्यू पावला होता. 'रात्री कुठे उठून जाऊ नका.' गॅलबो काळजीच्या सुरात सांगू लागला. त्यारात्री आम्ही रात्रभर तंबूत झोपेविना तळमळत होतो. कॅंप होता मक्याच्या शेतात ! जरा खुट्ट झालं की पर्वत चढायला सुपा एवढे काळीज करून आलेल्या आम्हा पोरींचा जीव दाण्या एव्हढासा होऊन जाई ! स्लीपींग-बॅगमध्ये अधिकच गुदमरायला होई ! शेवटी एकदाची सकाळ झाली. कॅंप उठला. आणि जीवानिशी आम्ही व गॅलवो-दाजू निघालो पुढच्या मुक्कामास !

परतीच्या प्रवासांत ह्याच दिब्रुगेटाने पुन्हा एकदा आपला हिसका दाखवला आम्हा मृगथुनी-मंडळींना ! या खेपेस उघडया शेतावरून आम्ही खालच्या अंगाला आलो. एप्रिल महिन्यात गॅलबो नंदादेवी-मोहिमेत आला होता तेव्हा त्याचा शेर्पा मित्र दिब्रुगेटालाच मृत्यु पावला होता. दिब्रुगेटाशी असा दोन व्यक्तींचा मरणाचा संबंध आलेला. त्यात आम्हा लोकाकडून एक भर पडते

हिम-पुत्र शेरपासंगे नटलो आम्हीं ।
चढुनीच जावया हिमशिखरांच्या राशी ।।

की काय अशी गंभीर परिस्थिती निर्माण झाली. एक पोर्टर दिब्रुगेटच्या मुक्कामी आजारी झाला न्युमोनियाने. चोवीस ऑक्टोबरची ती संध्याकाळ जीव मुठीत धरून काढली. पोर्टर स्ट्रेचरवर पडला होता. डॉक्टरने सर्व काही व्यवस्थित दिले होते. औषधे सज्ज होती. रात्रभर कुणालाच स्वस्थता नव्हती. सकाळ झाली. मेमसाहेबांच्या तंबूचे दार उघडून गॅलवो-दाजू आनंदाने उद्गारला 'Memsahib, sickman no dead !'

गॅलबो मला नेहमी उत्तेजन द्यावयाचा चालताना. "संभालके चलना ! गिरना मत !" ह्या नेहमीच्या दिलाशा खेरीज म्हणावयाचा, 'तुम्ही मुंबईच्या मुली. पहाडावर प्रथम आलेल्या. तुमचं कौतुक करावं तितकं थोडं. आम्ही अडाणी निरक्षर माणसं. आमचा जन्म गेला पहाडाच्या आंगो-खांद्यावर. उद्या तुमच्या शहरात आलो तर रस्तासुद्धां ओलांडता येणार नाहीं मला एकटयानं !'

रहदारीचा रस्ता ओलांडण्यास घाबरणारा हा शेर्पा-दाजू मृगथुनी पर्वत सरसर चढून गेला व उतरला ! आम्ही भारत-स्काऊट-गाईडचा ध्वज घेऊन गेलो होतो. राष्ट्र-ध्वजाबरोबर शिखरांकडे जाताना राष्ट्रध्वज परत आणला व गाईडचा झेंडा तसाच रोवून ठेविला शिखरांवर.

गॅलबो-दाजूने माझ्याकडे फक्त एकच गोष्ट मागितली. आम्हा दीदींची "यादगार" म्हणून तसाच एक 'झेंडा मला द्या.' नवी-दिल्लीला आम्ही १ नोव्हेंबरला पोहोचलो. तो दिवस रविवारचा. सुटीचा. दुसऱ्या दिवशी मी झेंडा खरीदला. गॅलबोला हाक मारली. "ही आमची आठवण" म्हणत झेंडा त्याच्या स्वाधीन केला. स्थितप्रज्ञासारखा शांत गॅलबो त्या देण्याने एकदम खडीसाखरे-सारखा विरघळला. Thank You असे ओठातल्या ओठात पुटपूटून तो घाईने निघून गेला !

सांगबू आणि लोपसांग साऱ्या शेर्पांत वयाने लहान. आधीच हे शेर्पा-लोक दिसायला लहानखोर. तोंडावरून वयाची कल्पना येत नाही त्यांच्या. ही दोन मुले तर कोवळया कणसासारखी दिसत !

उसासारखी गोड ! साऱ्या कामात तरबेज. विशेषतः मस्करी करण्यात. अलगूज वाजविण्यात !

लांबून सांगवूला बघावा ! डिट्टो काऊ-बॉय !! त्याच्या कृश व दणकट बांध्याला रंगीबेरंगी कपडे असे फिट्ट बसत की मध्ययुगातला एखादा गुलजार जवानच घोडदौडीला निघाला आहे जणूं ! पण सांगवूचा चेहरा राकट व रांगडा नाही. रंगेलपणाची मस्ती त्याच्या चेहऱ्यावर एव्हढीसुद्धा नाही. विलक्षण चैतन्याने त्याचा कण न् कण भरला आहे. आयुष्याच्या घाण्याला तो अजून जुंपला गेलेला नाही. त्याची कोवळीक अजूनहि करपली नाही.

तीच गोष्ट लोपसांगची. लोपसांग चांगला लांब आहे. नजर भिरभिरती. कुतूहलपूर्ण आणि चंचल. त्याला वाऱ्यासारखे सुसाट धावावे असे वाटते. ओढ्यासारखे खळाळत जावेसे वाटते. गोफणीसारखे भिरभिरत जावेसे वाटतें. असा हा लोपसांग गतिमान् आहे. शक्तिमान् आहे.

सांग्वू-लोपसांगची दुक्कल म्हणजे चेतना व गतीची सांगडच जणू ! बर्फावरून उतरणीवर येताना दोघे सरळ घसरगुंडी करीत येत. मला शिकवत. "हे असे दोन पाय घट्ट रोवावयाचे प्रथम. मग Ice-axe ही अशी पकडायची आणि मग जायचें सुर्रकन् !"

कुरणात वासरे बागडावी तशी बर्फांतून नाचत, उडत, गाणी गात दहादा वरखाली खेपा घालीत. सिनेमातला टारझन काय उड्या मारील अशा चपळाईने माकडासारखे पटापट झाडांवरून हां हां म्हणता दृष्टिआड होत. झाडाझुडपातून घुसत. काट्याकुट्यातून, नदी-नाल्यातून लीलया पार होत. कँपवर पोहोचले की भराभरा कामाला लागत. तंबू उभारत. एअर-मेट्रेसमध्ये हवा भरीत. स्लीपींग-बॅग त्यावर ठेवीत. मध्येच सिगरेटचे दमदार झुरके घेत. पोर्टर्सना दमात घेत. संध्याकाळी पेट्रोमॅक्सचा दिवा लावून घेत. ट्रान्झिस्टरची बटणे उलट-सुलट फिरवत. छुन्झेन् सोनाम्च्या हाताखालीं, ताशीच्या नजरेखाली राहात.

आमच्या मृगथुनी मोहिमेत सर्वांत त्रास दिला पोर्टरांनी ह्या जोडीला ! "लता"पासून ह्या दोघांच्या नशीवी ते मजूर–लोक असे काही लागले की त्यांच्यापायी ह्या दोघांचा जीव नुसता टेकीला आला!

तेवीस सप्टेंबरला आम्हीं "लता"ला आलो. तेथून मजूर गोळा करून आम्हाला पुढे जावयाचे होते "त्रिदंग" आहे सोळाहजारपांचशे फूटांवर. मध्ये "लताखरक", (१२,००० फूट) "धरानसी", "दिब्रुगेटा" (११,४८० फूट) "दिओडी," (११,१९० फूट) "बिथारतोली" (१२,५४० फूट) हे मुक्कामाचे पडाव. सारे पहाडातले. मध्ये ना शेती ना वस्ती. मजूर लोक होते थोडेसेच. सामान होते पक्के पंधरा मण. त्यातच चोवीस सप्टेंबरला आम्हाला पावसाने जे कोंडीत धरले ते अठ्ठावीस तारखेपर्यंत ! उरलेले सामान आम्ही त्या दोघांच्या जबाबदारीवर मागे टाकले व तीन ऑक्टोबरला बेसकँपवर आलो. सांगवू-लोपसांग आणि इतर सामान व मजूरांचा काफिला आला सात ऑक्टोबरला !

ह्या दहा दिवसात त्या दोघानी फार कष्ट उपसले. मला आठवते. आम्ही रोज त्यांची वाट पाहात होतो. आज येतील. उद्या येतील. छुन्झन न चुकता सांग्वू-लोपसांगचा जेवणातील वाटा काढून ठेवावयाचा. ताशी अस्वस्थपणे रोज एक फेरी मारून यावयाचा. सरपण आणावयास गेलेल्या गगनबहादूरला व 'बुड्या' केदारसिंगला छेडावयाचा. मग सहा तारखेस ताशी-गॅलबो-आंगफुतासोनाम् ही दाजू-मंडळी वरती बर्फातील कँपस्कडे रवाना झाली.

त्या अफाट हिमराशींच्या पायथ्याशी आमचा मोठा तंबू, छुन्झेन्चं स्वयंपाक-घर, माणसांच्या घटलेल्या संख्येमुळे भकास दिसूं लागले. सकाळ-दुपार व संध्याकाळ-रात्र ही दिवसाची चाके निष्क्रियतेच्या गाळांत रुतून बसली !

दुपारच्या प्रहरी भूक नसता जेवणाचे सोंग करीत मी उगीचच भात चिवडत होते तंबूत. तोच त्या कंटाळवाण्या वातावरणाचा भंग करणारी एक हाक कानी आली. छुन्झेन धडपडत उठला. तंबूच्या दारातून वेगाने बाहेर पडला. मीहि पानावरून उठले. आणि सांग्बू-लोपसांगचा चिरपरिचित आवाज ऐकताच सुटकेचा निःश्वास टाकला. चला ! मुले आली एकदा !

सिद्धहस्त छुन्झेनच्या जेवणात होती त्या दिवशीं नेमकी कारल्याची भाजी ! अन् बासमती तांदुळाऐवजी उकडा तांदूळाचा भात !! मीठ संपले होते. मसाला नव्हता. चहा-साखर कमी झाले होते.

आणि आता ही मुले देवोडीला ठेवून आलेल्या सामानांच्या बोज्यांसह भर दुपारच्या प्रहरी श्रांत क्लांत होऊन उभी ठाकली होती !

ताशी-दाजूने मला बजावून सांगितले होते "आले की पाठवून द्या वरती दोघांना !" सरदाराच्या हुकुमाप्रमाणे दोघे तासाभरात पुन्हा बर्फ तुडवीत वर निघाले. चेहऱ्यावर थकवा नव्हता. नजरेत गुस्सा नव्हता. फक्त हासू. उन्हात चमकणाऱ्या दवबिंदूसारखे सोनेरी सोनेरी.

मला "टाटा" "बाय बाय" करीत ती पाठमोरी दुक्कल मृगथुनीच्या दिशेने निघाली तेव्हा मी फक्त स्तिमित होऊन उभी राहिले !

या सात दाजूंच्या सहवासातील असे कित्येक प्रसंग माझ्या आठवणीत आहेत. कित्येकदा मी त्या सात दाजूंच्या पुढे अवाक् होऊन बसले !

मृगथुनी मोहिम संपली. वीस सप्टेंबर ते एक नोव्हेंबरचा तो मोहिमेचा कालखंड आता इतिहासजमा झाला आहे. आम्ही सातजणी आलो त्या ठिकाणी परतलो. मिसेस जॉयीस धनशीथ इंग्लंडला रवाना झाल्या. दुर्गा शिलाँगला परतली. रानी हैद्राबादला. उषा बंगलोरला. मी, शारदा व खुर्शीद मुंबईला. ते सात शेर्पा-दाजू दार्जिलिंगला गेले.

दार्जिलिंगला ते जवळ जवळ राहातात. ताशी, सोनाम्, आंगफुता, छुन्झेन् ही कुटुंबवत्सल मंडळी एकाच आळीत राहातात. गॅलबो दार्जिलिंगपासून आठ मैल दूर राहातो. सांगवूलोपसांग दुसऱ्या आळीत राहातात.

पहाडांवर यावयाचें हा त्यांचा पोटा-पाण्याचा व्यवसाय. मृगथुनी पर्वत चढताना त्यांनी मात्र कधीहि व्यावसायिक वृत्ति आम्हां मुलीना दर्शविली नाही. ती बाजारी वृत्ति त्या कोणातच कधीहि नव्हती.

मुंबईच्या कॉस्मापॉलिटन धक्काबुक्कीत आम्हां स्त्रियांना आता पुरुषी वळण लागले आहे. 'चावट मेला' 'मवाली मेला' असे वैतागाने म्हणत आम्ही मुली-स्त्रिया सदा संशयाने नजरा रोखीतच इथे शहरात वावरतो.

जिथे जीवनाची मूल्येच उरलेली नाहीत अशा आमच्या बिन-बुडाच्या आयुष्याची आम्ही शहरात चाकोरी निर्माण केली आहे.

मृगथुनी पर्वताच्या निमित्ताने माझी चाकोरी निराळी झाली. काही आठवडे पायवाट वेगळी झाली. ती पहाडी झाली. मध्य-हिमालयांतील २२,४९० फूटांवरील मृगथुनी शिखरांपर्यंत मी वाटचाल केली. तेव्हा सोबतीला हे सात साधेभोळे शेर्पा होते. ते होते म्हणून पहाडी जीवन पूर्णांशाने आंगवळणी झाले. ते नसते तर मृगथुनी शिखर हातीं कधींच आले नसते. ते नसते तर आणखीहि खूप खूप हातीं आले नसते हेहि निर्विवाद!

घरी परतताना मी निरनिराळ्या वस्तु रुकसॅकमध्ये भरल्या. कांहीं चमकदार गोटे. कांहीं धूपांच्या निरनिराळ्या तऱ्हा. औषधी वनस्पति व मुळ्या. भूजपत्रांच्या भेंडोळ्या. एक लांकडी सुरी, चमचा व काटा.

ती पहाडी संपत्ति म्हणजे माझा एक वेगळाच आनंद आहे. चमकदार गोटे आहेत. पहाडी प्रदेशातील निरनिराळी स्टेशने! हा गोल दगड सोनाम्ने मला देओडीला दिला. तो चौकोनी बेथारतोलीला आंगफुताने दिला. उषाचा झाडावरून तोल सुटला व ती खाली कोसळत होती, तेवढ्यात तिनें प्रसंगा-वधान राखले आणि दोन्ही हातानी तिने झाडावरची लटकणारी दोरी पकडली. लोपसांग तिरासारखा धावला आणि फुलासारखी झेलली तिला! हाच तो रक्त गोठवणारा बेथारतोलीचा प्रसंग. हा छोटासा बद्रीनारायणाच्या यात्रेतून येताना मीच वेचून काढला अलकनंदेच्या प्रवाहातून!

धूपांच्या जुड्या नाकाशी न्याव्यात! त्यांच्या सुकलेल्या पाना-तून अद्यापही ती 'लताखरक'ची डोंगरी हवा माझ्या घाणेंद्रियां-तून विद्युत्वेगाने शिरते! ज्या 'लताखरक'ने पावसात हैराण केले त्याच ह्या लताखरकने ह्या धूपांच्या निरनिराळ्या तऱ्हाही दिल्या. देणारा होता लोपसांग. अक्रोडाच्या झाडांवर दगडांचा असा काही मारा केला लोपसांगने जणूं चिंचेच्या झाडांवरच तुटून पडला आहे आपल्या गावाकडील कुणी पोर!

मुक्कामावर पोहचल्यावर स्वारीने चमचा बनविला. सुरी बनविली. बोट कापून घेतले. त्या वस्तु पाहिल्या की, 'बेथारतोली' डोळ्यांपुढे येते. एकोणीस ऑक्टोबर ते तेवीस ऑक्टोबरपर्यंत बेथारतोलीच्या कँपमध्ये आम्ही मजूर लोकांची येण्याची वाट पाहात दिवस काढले. त्याच चार दिवसांत कोजागिरी पौर्णिमा आली. सचैल आंघोळीची पर्वणी साधली. रेशन संपलें, म्हणून मीठाविना अन्न गोड मानले. दूध-साखर विरहित चहाचे पाणी घशाखाली ढकलले. मजूर येताच आम्ही झपाट्याने निघालो.

'देवोडी'च्या भूजपत्रांच्या त्या भेंडोळ्या हाताशी धरल्या की त्या जागी, आंगफुताकडून त्याची इंग्रजी नांवाची सही घोटविली ते डोळ्यापुढे चितारले जाते. शिक्षणापासून सदोदित दूर राहि-लेला त्याचा ओबड धोबड हात स्वतःची अक्षरे गिरविण्यांत किती हलका होता, किती चट्कन् त्याने Angfuta हीं अक्षरें गिरवून शाबासकी मिळवली हे आठवतें.

सर्वांची आठवण म्हणून देवोडीच्या त्या मुक्कामांत एका भूजपत्रावर रानीकडून मी भारत-स्काऊट-गाईडचा ध्वज काढून घेतला. त्यावर आम्हां सर्वांच्या सह्या घेतल्या. आंगफुताने आपली ताजीतवानी सही काय पण डौलात ठोकून दिली होती! एकटा सोनाम्च सही न करणारा निघाला. त्याचा भिडस्त स्वभाव सही करण्यापुरते शिकण्यास देखील तयार नव्हता! "ना ना" असे मान डोलवून तो गप्प राहिला. ह्या त्या साऱ्या आठवणी भूजपत्रांचा जुडगा माझ्यापुढे उभा करतो.

मृगथुनीच्या आठवणी अशा मनात कायमच्या खोल दडून बसल्या आहेत.

मृगथुनीच्या निसर्ग सौंदर्यापेक्षा मृगथुनीच्या माणसांची मोहिनी अधिक अपूर्व वाटते.

पर्वतारोहणाचा अनुभव साहसाचा खरा. दगदगीचा. धोक्याचा. हे सारं असूनहि हा जीवावरचा खेळ आज कित्येक वर्षें गिर्या-रोहक खेळत आहेत. हे शेर्पा त्यांना साथ देताहेत.

आम्हा मुलींना त्यांनी साथ दिली सौजन्याची. कर्तव्यपरा-यणतेची. एकजुटीने, एकदिलाने, सहकार वृत्तीने राहण्याची. स्त्रिया म्हणून मान राखिला. 'दिदी' म्हणत बहिणींची भावाच्या मायेने काळजी घेतली. शब्दाने किंवा कृतीने कधीहि त्या भावनेत अंतराय येऊं दिला नाही.

हे पहाडी स्त्रीदाक्षिण्य अपूर्व होते. अनमोल होते. निरपेक्ष होते.

मृगथुनी पर्वतावरील अनुभवांबद्दल घरचे दारचे अनेक कुतु-हलाने विचारतात. मामा, मावशी, मामी आणि मित्र, मैत्रिणी प्रश्न करतात तेव्हा लहानपणी आईने ऐकवलेल्या गोष्टीची सुरुवात मला आठवते.

"आटपाट नगर होतं. तिथे एक दिदी होती. तिचे सात दाजू होते. ताशी, छुन्झेन, सोनाम्, आंगफुता, गॅलबो अन् सांग्वू-लोपसांग."

• • •







अनुक्रमणिका

कविवर्य रवीन्द्रनाथ टागोर ह्यांच्या 'चित्रा' ह्या नाट्यकाव्यांत एक दिव्य प्रीतिकथा रंगविलेली आहे. त्या कथेचा पूर्वार्ध आपण गेल्या अंकी वाचलांत. आता वाचा त्या कथेचा उत्कट उत्तरार्ध–

# चित्रांगदा

—सौ. मोहिनी वर्दे

[प्रवेश ६]

[अर्जुन व चित्रांगदा रानात विश्रांती स्थळीं]

**अर्जुन :** हा माझा क्षत्रीयाचा बाहू आळसावलेला कसा ?

**चित्रा :** प्रियकरा आपले भाव मला सांगू शकाल ?

**अर्जुन :** कां नाहीं ? प्रिये आज शिकारीच्या विचारांनी माझ्या मनात थैमान घातलं आहे. पहा जलधारानी सृष्टी चिंब झाली आहे. मुसळधार वृष्टी पर्वतराजीला झोडपून काढीत आहे. मेघांच्या काळ्याभोर सांवल्या रानावर पडल्या आहेत. उन्मत्त तारुण्याच्या कुत्सित हास्याप्रमाणे पाण्याने फुगलेला प्रवाह किनाऱ्याला धडक देत आहे. अशा पावसात आम्ही पांच भाऊ रानटी जनावरांच्या शिकारीसाठीं चित्रक जंगलात जात असूं. मोठे सुखकर होते ते दिवस. मेघांच्या गडगडाटाबरोबर आमचं हृदय थुई थुई नाचत असे. मोरांच्या केकानीं सबंध रान प्रतिध्वनित होत असे. पावसाच्या थडथडाटात आणि धबधब्यांच्या धडधडाटात भित्र्या हरणांना आमची चाहूल लागत नसे; ओल्या मातीवर वाघाच्या पंजाच्या खुणा उमटत आणि त्यांची लपण्याची जाळी विनासायास सांपडे. शिकार झाली कीं एकमेकांना आव्हान देत. घोंघावणाऱ्या पाण्याच्या प्रवाहात पोहत आम्ही परतत असूं. तो उन्माद मला स्वस्थ राहूं देत नाहीं. मला शिकार करावयाची आहे. प्रिये, शिकार करायची आहे.

**चित्रा :** राजा तुझं सांप्रतचं लक्ष्य तूं साधलं आहेस कां ? ज्या सोनेरी हरणाला तूं सावज ठरवलंस ते तुला लाभलं कां ? नाही. स्वप्नाप्रमाणे ज्या क्षणीं ते सांपडलसं वाटतं त्या क्षणीं ते नाहीसं होतं. पहा जलधारारूपी सहस्र बाणांचा वर्षाव पाऊस वाऱ्यावर करीत आहे तरी वारा स्वतंत्र आहे. आपला हा खेळ त्याप्रमाणे आहे. राजा ! ज्या सौंदर्याचा तूं पाठपुरावा करीत आहेस ते सर्वस्वी तुझ्या हातीं कधीं सांपडू शकत नाहीं. अस्पर्श ते अप्रूप राहातं.

**अर्जुन :** प्रिये तुला वसतिस्थान नाहीं का ? की जेथे तुझ्या आगमनाची वाट पहात तळमळणारं हृदय असेल. तुझ्या सेवेनें प्रफुल्लित झालेलं आणि तूं रानात निघालीस तेव्हा दुखावलेलं तुझं घर कोठें आहे ? सांग.

**चित्रा :** हा प्रश्न आजच कां आठवला ? विचाराला न सुचलेले सौख्याचे दिवस संपले का ? प्रियकरा, मी आहे तेवढी आणि आहे तशीच आहे. माझ्यापुढचं क्षितिज अटळ आहे. किंशुक पुष्पावर ठिबकलेल्या दवबिंदूला ना नांव ना गाव. उत्तर मिळेल का कधी या प्रश्नाचं ? जिच्यावर तूं प्रेम करतोस ती तशी एक मुक्तमणी आहे.

**अर्जुन :** जगाशीं तिचा काही का संबंध नाहीं ? देवांच्या निष्काळजीपणाने पृथ्वीवर अवघडलेला स्वर्ग आहेस तूं ?

**चित्रा :** होय.





अनुक्रमणिका

**अर्जुन :** म्हणून तुला एकसारखा हरवून बसतो मी. माझं हृदय अजून भुकेलेलं आहे; मन शांतीच्या शोधात भरकटतंय्. ये जवळ ये. तुझ्यापर्यंत पोहोचूं न शकणाऱ्या माझ्या अगदी जवळ ये. तुझं नांव, तुझं कुळ ज्ञात होऊ दे मला. प्रिये, तुझ्या प्रेमाच्या निवाऱ्यात समाधानाने पहुडावसं वाटतं ग !

**चित्रा :** प्रियतमा ! ढगाचा फुलोरा, लाटांचं नर्तन, फुलांचा गंध पकडण्याचा कां हा वृथा हव्यास ?

**अर्जुन :** माझ्या हृदयसम्राज्ञे, हवेसारख्या अनिश्चित पोकळींत माझ्या प्रेमाला उधाण येत नाहीं; इच्छापूर्तीपेक्षा शाश्वत असं काहींतरी मला हवंय्. दुःख सुद्धा तरून जाता आलं पाहिजे त्याच्या वळावर.

**चित्रा :** माझ्या हृदयसम्राटा, अजून वर्ष देखील झालं नाही आणि आताच तूं कंटाळलास ! आज मला अर्थ कळतो. खरंच क्षणभंगूर आयुष्य हे वरदान आहे देवाचं फुलाला. गेल्या वसंतात विरला असता ना माझा देह तर अहेवपणाचं मरण असतं, त्याला. पण, हाय ! प्रियतमा त्याचेही दिवस मोजके आहेत. आतां त्याला अंतर देऊं नकोस. त्यांतील मधू पिळून घे. सौख्याचा सांठा संपत आला आहे. नंतर कोमेजून गेलेल्या फुलावर पुन्हा झेपावणाऱ्या भुंग्याप्रमाणे तुझं हृदय व्याकूळ होईल.

## [प्रवेश ७]

**[ मदन चित्रा प्रवेश करतात]**

**चित्रा :** आज शेवटची रात्र आहे. हे प्रीतिदेवा आज माझं सौंदर्य विझण्यापूर्वी प्रखर होणाऱ्या ज्योतिप्रमाणें तळपूं दे.

**मदन :**–तुझ्या इच्छेप्रमाणें होईल.

## [प्रवेश ८]

**(खेडूत चिंताक्रांत आहेत. अर्जुन प्रवेश करतो)**

**खेडूत :**–आतां आमचं रक्षण कोण करील?

**अर्जुन :**–तुमच्या राज्याचा रक्षणकर्ता कुणी नाहीं का ?

**खेडूत :**– राजकन्या चित्रा आमची माता होती, आमची पिता होती, संहारक शक्तीपासून ती आमचं रक्षण करीत असे. ती यात्रेला गेल्यापासून आमचा त्राता उरला नाही. (जातात)

**अर्जुन :**–काय ? या देशाची रक्षणकर्ती एक स्त्री होती ?

**चित्रा :**– (प्रवेश करून) नाथ आपण एकटे सचिंत का ?

**अर्जुन :**–राजकन्या चित्रा कशी असेल याचा मी विचार करतो आहे. तिच्याबद्दल पुष्कळ ऐकत आहे.

**चित्रा :**–हं ! पण ती रूपवती नाही हे विसरू नका. माझ्यासारखे अगदीं मृत्यूच्या रंगाप्रमाणे काळभोर नेत्र नाहींत तिचे. सावजाला मारण्याचं कौशल्य माहीत असलं तरी नाथ आपल्या हृदयाला जखमी करणं जमायचं नाहीं तिला.

**अर्जुन :**– पुरुषाप्रमाणें शौर्यशाली आणि स्त्रीप्रमाणे मृदु हृदय आहे तिचं.

**चित्रा :**– तेच तिचं सर्वात मोठं दुःख आहे. स्त्री जेव्हा केवळ स्त्री असते तेव्हां ती सुखी होऊ शकते. आपल्या कटाक्षानीं आणि सौंदर्यानी पुरुषाला जिंकून घेऊ शकते. पण चित्रा तशी नाही. तिच्या धैर्याचा आणि शौर्याचा काय उपयोग ? माझ्या आदर्श पुरुषा, काल-जरी तूं तिला शंकराच्या मंदिरात पाहिली असतीस ना ? तरी पळभर दृष्टीक्षेप न टाकता तूं निघून गेला असतास. तिच्या पुरुषी गुणांचा हव्यास धरण्याचं तुला काय कारण ? चल माझ्यावरोबर. चल फेसाळत्या प्रपातांच्या तुषारांनी भिजलेल्या हिरव्या पानांची शेज मी आपल्यासाठीं रात्रीप्रमाणे अंधकार असलेल्या गुहेत रचली आहे. तिचा मार्ग मी तुला दाखवते. काळचा दाट काळोखातल्या दगडावरचं निसरड शेवाळ तुला अंगाई म्हणील.

**अर्जुन :**–नाहीं, आज नाहीं प्रिये.

**चित्रा :**–आज कां नाही ?

**अर्जुन :**–रानटी टोळचानी गांवावर हल्ला केला आहे. मला त्याचं रक्षण केलं पाहिजे. सोड प्रिये सोड मला. शस्त्रांना धार करण्यास मला गेलं पाहिजे. हा माझा क्षत्रीयाचा बाहू आज त्याला साजेसं काम करून कृतार्थ होऊं दे.

**चित्रा :**–नाथ, आपण एवढे अस्वस्थ कां ? मी नाही म्हटलं तरी माझ्या कोमल हाताचा विळखा झुगारून देऊन आपण जाणार ? आपल्या मनश्चक्षूंवर आज कोणाची मूर्ती कोरली गेली आहे ? चित्रा ?

**अर्जुन :**–होय चित्रा ? चित्रा ! तिनं घराचा त्याग कां केला असावा ? तिला काय असाध्य होतं !

**चित्रा :**–असाध्य ? प्रियतमा काय लाभलं तिला या जगात ? दुर्दैवी बिचारी. स्वतःचे गूण आणि शक्ती यांत कोंडून पडलं होतं तिचं स्त्रीहृदय पिंजऱ्याप्रमाणें. स्त्रीसुलभ प्रीती कुरूपतेत खितपत आहे. सौंदर्यानें तिच्याकडे पाठ फिरवली आहे. ती कशी आहे सांगू? ढगाने वेढलेली विमनस्क सकाळ आपला प्रकाश आवरून घेऊन खडकाळ डोंगरमाथ्यावर उदास बसते ना तशी. कां तिच्याविषयीं अधिक जाणून घेण्याची ही उत्सुकता. पुरुषाच्या कानांना गोड लागणार नाहीं ती तिची कथा.

**अर्जुन :**–सांग सगळं सगळं सांग मला तिच्याविषयीं. मी जणू काही एखाद्या पांथस्थाप्रमाणे रात्रीचा काळोखात बुडून गेलेल्या शहरात आलो आहे. झाडं झुडपं, पानं फुलं सर्वांवर पूर्ण अंधार पसरला आहे. समुद्राचा खारा वारा त्यावर गूढतेचं आवरण घालीत आहे. आणि मी सकाळ होण्याची वाट पाहात आहे. चित्रे, तूं कशी असशील ? ती पहा माझ्या मनश्चक्षूसमोर ती दिसते. ती पांढऱ्या शुभ्र घोड्यावर स्वार झालेली विजयदेवता. आशेचा वारा तिच्या सर्व बाजूंनी वाहात आहे. पाहारा करणारी सींहीण ज्याप्रमाणे आपल्या छाव्याचा सांभाळ करते त्याप्रमाणे ती आपल्या प्रजाजनांना सांभाळीत आहे. बाणांच्या सहवासाने घट्ट झालेले तिचे हात मला सुंदर भासत आहेत. चल सौंदर्यवती प्रिये चल. आपण अवकाशात जाणाऱ्या सूर्याच्या जुळ्या किरणाप्रमाणे पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसून जोडीने प्रवास करूया. श्वास कोंडू पाहाणाऱ्या वासनेच्या गुहेतून बाहेर पडू या.








**चित्रा**:—अर्जुना, मला एका प्रश्नाचं उत्तर दे. बोल ह्या क्षणी जर एखाद्या जादूमुळें माझ्या मादक शरीराचं ह्या व्यवहारापासून दूर राहू पाहाणाऱ्या मांसल, लाचार सौंदर्याचं आवरण उसन्या वस्त्राप्रमाणें फेकून दिलं तर तूं सहन करशील? ताठ उभी राहून धिटाईने या घातकी दुष्ट सौंदर्याचा धिक्कार केला तर तूं सहन करशील? धुळीत लोळणाऱ्या निराधार वेलीप्रमाणे-न राहाता पर्वतावर पसरलेल्या ज्वालेप्रमाणे उंच जाण्याचा प्रयत्न केला तर अर्जुना तुझ्या पौरुषाला माझा मोह पडेल का? नाही. त्रिवार नाही. पहा ही कल्पना सुद्धा तुझ्या मनाला पेलवणार नाही. त्याकरिता चंचल तारुण्याची नश्वर किमया धारण करून तुझी प्रतीक्षा करीत राहाणं हाच मार्ग मला अवलंबू दे. जेव्हा तुला सुखासाठी छायेत यावसं वाटेल तेव्हां सौख्याची मदिरा मादक देहाच्या प्याल्यांतून तुला भरभरून अर्पण करूं दे. तू थकून जाशील किंवा अतिप्राशनाने श्रांत होशील तेव्हां तूं तुझ्या राज्यकारभारासाठी जायला मोकळा होशील. आणि शेवटी अर्जुना जेव्हा मी जराजर्जर होईन तेव्हा माझ्या वाटणीला आलेल्या कोपऱ्यात कृतज्ञतेने एकटी पडून राहीन. खरंच, रात्री तुझी शैय्या सजवणारी सखी दिवसा तुझ्या सचिवाप्रमाणे कार्यरत झालेली तुला साहावेल का?

**अर्जुन**:—मी तुला कधी पुरता ओळखू शकलो नाही. सोनेरी मुर्तीत ओतलेली तूं कुणी देवता आहेस का? मी तुला स्पर्श करूं शकत नाही. तुझ्या अनमोल उपकाराची अंशतः परतफेड देखील मी करूं शकत नाही. म्हणून माझी प्रीति अपुरी वाटते. कधी कधी तुझ्या विषण्ण हास्यामध्ये खोल अर्थ दडल्याचा मला भास होतो. तुझ्या अर्थगर्भ खेळकर उद्गारांत लपलेली वेदना उराशी कवटाळून हास्याचा झुळझुळीत बुरखा पांघरलेली दुसरी कुणीतरी मला खुणावते. सत्याचं पहिलं दर्शन आभासमय असतं. कोणत्यातरी बहाण्याने जवळ येतं ते. पण प्रिये, असा एक काळ आला पाहिजे जेव्हा आभरण दूर सारून फक्त सत्य त्याच्या निखळ रूपांत दर्शन देतं. मला तुझ्या त्या अंतीम स्वरूपाचा ध्यास लागला आहे.

अरेरे! राणी तुझ्या डोळ्यात पाणी? आपल्या कोमल करकमलांनी चेहरा झांकून का घेतलास? प्रिये दुखवलं का मी तुला? तर मग विसरून जा मी काय म्हणालो ते. आहे त्या स्थितीत मी संतुष्ट राहीन. दूरून अंधाराच्या अदृष्य घरंटचातून झेपावत येणारं प्रत्येक सुखाचं क्षणप.खरू. सुगंधी स्वरलहरींचा निरोप घेऊन असं येत राहूं दे आणि आशेच्या तीरावर साक्षात्काराची वाट पाहाता पाहाता जीवनाची वाटचाल संपूं दे.



तो शिल्पकार दिसतोय, वर्तमानपत्रांत तसे छापून आलंय् ना ...?

## [प्रवेश ९]

**(चित्रांगदा बुरखा पांघरून प्रवेश करते, अर्जुन पुष्करणीच्या तीरावर बसलेला आहे.)**

**चित्रा**:—हे माझ्या परमेश्वरा, सौख्याच्या 'प्याल्यातील शेवटचा थेंब रिता केलास ना? हा खरोखरच का शेवट आहे? पण सर्व काही रितं झाल्यावर मला यज्ञातील शेवटचं दान करू दे. पहा तुझ्यासाठी, माझ्या हृदयेश्वराच्या पूजेसाठी स्वर्गातील नंदनवनातून अनुपम सौंदर्याची पुष्पलेणी मी आणली होती. जर आता ती सुकली असतील, त्यांची पूजा संपली असेल तर त्याना मंदिरातून फेकून देऊं दे मला.

(बुरखा दूर सारून)

पहा तुझ्या भक्ताकडे डोळे भरून कृपादृष्टीने पहा. ज्या फुलांनी मी तुझी पूजा बांधली त्या फुलासारखी मी सौंदर्यपूर्ण नाही. माझ्यात अनेक दोष आहेत. मी कलंकित आहे. मी जगातील साधी प्रवासिनी आहे. माझी वस्त्रे मलीन आहेत. काटचाकुटचानीं माझे पाय रक्ताळलेले आहेत. क्षणभंगूर फुलाचं सौंदर्य माझ्यात कोठून येणार? परंतु एक स्त्रीहृदय भेट म्हणून अभिमानाने मी तुझ्या पायाशी आणलं आहे. सुख दुःख, आशा निराशा, लज्जा, भय, सर्व भावनांची फुलं या धूलीप्रमाणे क्षुद्र हृदयात फुलल्या आणि इथंच अशाश्वताकडून शाश्वताकडे जाणारी प्रीत बहरून आली. ती अपूर्ण असेल पण पवित्र आहे. स्वर्गीय फुलाचं कार्य संपलं असेल तर तूं हिच्याकडून सेवा करून घे. मीच राजकन्या चित्रा आहे.

तुला आठवत असेल पूर्वी एकदा शिवमंदिरात-चित्रविचित्र वस्त्राभरणानीं नटलेली एक स्त्री तुझ्यावर आसक्त होऊन एखाद्या पुरुषाप्रमाणें तुला मागणी घालायला आली होती. तूं तिचा अव्हेर केलास. तूं योग्य तेच केलंस. आजच्या चित्रेची ती एक भ्रष्ट नक्कल होती. नंतर मदनाच्या कृपेमुळें एक वर्षपर्यंत तिला स्वर्गीय सौंदर्य प्राप्त झालं. आणि त्या वेळेपर्यंत तुला हृदयावर प्रतारणेचं ओझं बाळगावं लागलं. मला क्षमा कर अर्जुना. पण आज तूं मुक्त आहेस. आज मी मुक्त आहे. देवतेप्रमाणे आराधाना करून घेण्याच्या लायकीची मी नाही की कीटकाप्रमाणे झटकून टाकण्याइतकी मी क्षुद्र नाही. माझी एक शेवटची विनंति ऐकशील का? प्रियतमा जिच्या उदरात तुझा गर्भ वाढत आहे त्या स्त्रीचा तूं स्वीकार करशील कां?

**अर्जुन**:— प्रिये आज मी तृप्त झालो.

●●●







अनुक्रमणिका










अनुक्रमणिका



तु. मो. साळी

# चोरी

**चोरी झाली केशोच्या घरात. कौलातून चोर उतरला. बोंबाबोंब झाली. चोराला आव्हाने दिली गेली—गाव जमला—पण अखेरपर्यंत चोर गावलाच नाही.**

**एक** जप झाली की, नाही झाली तोच केसोच्या कौलारू घरातून धपदिशी चोर खाली कुदला. समक्ष चोराला आमने-सामने उभा असलेला पाहून केसोला काय वाटले असेल ते केसोलाच माहित की देवालाच माहित ! धप्दिशी आवाज झाल्यावर तो तळकन् उठून उभा राहिला.

चोर केशाकडे बघतो आहे नी केशा चोराकडे बघतो आहे. हा ड्रामा लगभग पांच मिनटं चालला. मलेरियाचं हिव भरल्यागत केशा थरथर कापून राहिला होता. घावरलेला केशा आता चोराच्या पायावर डोके ठेवणार इतक्यात देवाची करनी अशी झाली की चोराच्या डोक्या-वर सपासप चार–सहा कौलं वरून आदळली. कळवळून चोर जागच्या जागीच अंधारी आल्यासारखा बसला. हे पाहून केशानं चपळाई केली. त्यानं चटक्न दाराची कडी काढली. चोर पाहून दातखिळी बस-लेल्या वायको–पोरांना बाहेर ढकललं, सोता बाहेर आला व दाराची कडी वरून लावून घेतली. नंतर "चोर आला... चोर... पकडा !" असा आक्रोश करू लागला.

त्याचे बाल–बच्चे पण त्याला साथ देऊं लागले. कुत्री अन्नाला जागली व त्यानी पण मनापासून कलकलाट माज-वला. इतकं झालं तरी गल्लीतला एक माणूस धावून येईना. कातावलेला केशा दात ओठ खाऊन शेजाऱ्यांच्या दारावर लाथा हाणूं लागला.

"भगवान्या, उठत नाही कां ?..."

"चिंतामन येळपरसंग सर्वांवर येतो ! घाबरू नको वाहीर ये !" शेवटी केशानं मोठमोठ्याने लोकाना नाना तऱ्हेच्या शिव्या देऊन पाहिल्या, हेतु हा की, लोक चिडून तरी बाहीर निघतील, पण एक कुत्रा वाहीर आला नाही. रातभर खो, खो करून झोपमोड करनारा इठ्ठल आज खकारा टाकण्यापुरता सुद्धा बाहीर पडला नाही.

केशाची आवस्था भलती विकट झाली. चोर घरात आनि वालबच्चे घेऊन तो सळकीवर उभा ! चोर घरात वसून काय करत आसल न काय नाही ? काय चीज-वस्तु पळवील, सांगता सोय नाही ! गरीव आसला म्हणून काय झालं ? गरी-बाला आज दोन आन्याचं टमरेल पन माहाग आहे !

पुन्हा चोराचा साथीदार सुरा घेऊन केव्हा पाठीमागे उभा राहिल याचा पत्ता लागनार नाही! बरं , वोंबा मारून घशाला कोरड पडली तरी शेजारचा एक माणूस बाहीर निघायला तयार नाहीं ! "परसंग बाका तो गधेकू कहना काका" या विचारानं त्यानं कुत्र्यानाच "मोत्या छूव !" "वाघ्या छूव." असे म्हणून भुंकायला लावले.

दुसरा खेळ सुटल्यावर लोकांच्या झुंडीच्या झुंडी सळकीवरून आल्या व त्याच्या घराजवळ थांबल्या. तेव्हा त्याच्यां जीवात जीव आला.

"चोर ऽ चोर ऽ !" म्हणून त्याने पुन्हा आकांत मांडला.

"चोर...चोर !" करून लोकानी गलका माजवला.

तसा गल्लीतला एक, एक मानूस





अनुक्रमणिका

एका हाती कंदील व दुसऱ्या हाती दंडा घेऊन बाहीर येऊं लागला. दमेला इठ्ठल "आपन जागेच आहोत" म्हणून दिसेल त्याला सांगू लागला. सजा भोगून आलेला इस्नू कैकाळी दिसेल त्याला सलाम करून "चोर कुठं आहे" म्हणून इचारूं लागला. हा गलवला माजला.

"कुठे आहे?"...एक जण दुसऱ्याला विचारूं लागला.

"केशाच्या घरात!" कुणी तरी उत्तर देत होता.

"कसा शिरला!" पुन्हा एकानं बॅटरी चमकावित विचारलं.

"कौलावरून...!"

"तुम्हाला कसं माहित पडलं?"

"केशाच सांगून राह्यला आहे!"

पुन्हा कलवला माजला. केशानं जवळ जवळ छप्पन वेळा हकीगत सांगितली. तरी "काय झालं?" म्हणून लोक त्याला सतावूं लागले.

पहेलवान लोकानीं पुढाकार घेतला. हुकूम सुटूं लागले. "तुम्हीं त्या बाजूनी व्हा! बावल्या, भगवान्या! चार-पांच गडी घेऊन तुम्ही कौलावर चढा, आम्ही इथं मजबूत आहोत!"

पांच मिनिटात केशाच्या घराभोवती गराडा बसला. पुन्हा लोकांचे तांफेच्या तांफे आले. केशाच्या घराभोवती अलोट गर्दी! पाय ठेवायला जागा राह्यली नाही! इतका दांगळो माजला की कोनाची जबान आपल्यासाठी आवाज करती आहे, हे शेजारी खेटून उभ्या राह्यलेल्या आसामीला कळेना! सामने-सामने उभे असलेले लोक हाताचा पंजे तोंडावर गोलाकार धरून बोलूं लागले! ऐकणारा कानाची बाही हाती धरून ऐकूं लागला! तरी समजेना. तेव्हा लोक एकमेकांना हाताच्या खुणा करून सांगूं लागले.

अशी संधी कधी मिळणार नाही, या इचारानं गावातले सगळे कुत्रे, आपसातलं वैर टाकून एकत्र जमले व गगनभेदी आवाजात भुंकू लागले.

इतकी गर्दी जमल्यावर चोराचं भेव कोणालाच उरलं नाही! गल्ली-गल्लीतली आजू-बाजूची सगळी बायका-मानसं, पोर-सोरं चोर कसा असतो ते बघायला लोटालोट करू लागली. कंदीलाच्या वाती मोठ्या झाल्या! दनादन् ठेंगे जमिनीवर आदळू लागले!

"पकडला की सोडू नका वेटचाला!"

"खाली आना सर्वांसमक्ष!"

"आज-काल लोकाला काम-धाम करायला नको, चोऱ्या करायला पाहिजेल!"

"भगवान्या इतका पुढे वाकू नको!"

"पडशील रे! भगवान्या."

"नाही पडणार!"

"रघ्या इतकी बॅटरी नको चमकवू! कालच मसाला भरलाय!"

"आपली बॅटरीक घरात आहे काका! ही दुसऱ्याची बॅटरीक आहे!"

"मग काही हारकत नाही. मला वाटलं का आपलीच बॅटरीक आहे!"

पुन्हा सावध राहण्याचा इशारा मिळाला. जोर-जोरानं शिट्ट्या पडल्या. खालच्या लोकानी नाक्या नाक्यावर मोर्चे बांधले. कंदीलाच्या वाती पुन्हा हद्दीबाहेर वर झाल्या. ठेंगे सळसळले. कुत्र्यांचा पुन्हा कल्ला माजला.

एक घंटा झाला तरी चोर येईना! हे पाहून सावध राहणारे लोक कंटाळून गेलें. कडेवरची पोरे कडेवर पुन्हा झोपी गेली. बिळचा-सिगारेटीच्या थोटकांचा खच पडला.

"दिसतो का?...."

"नाही दिसत..."

"नीट बघा."

पुन्हां पाच-पन्नास मानूस कौलावर चढला. आता आपल्या छपराचा भूगा केल्याशिवाय हे लोक राहाणार नाहीत या विचारानं केशा आणखीच रडकूंडीला आला. छपरावरची कौलं विसकटील आपल्या पायानं तुटतील म्हनून तो सोता आतापर्यंत छपरावर चढला नव्हता. पण दुसरी मानसं बेफिरीनं त्याचं छप्पर तुडवित होती. नाविलाज होऊन तो मुकाटचानं जे, जे होईल ते, ते बघत होता!

पुन्हा एक घंटा झाला. तरी चोर बाहीर येण्याचं लक्षण दिसेना! सगळे लोग चोराची वाट पाहात रस्त्यावर ताटकळत उभे होते. चोर येतो केव्हा आणि त्याला आपन तळाखा लगावतो केव्हा याची वाट पाहात उभे असलेले पहेलवान मिशिला पीळ देत चपल्या आंथरून जिमिनीवर बसून राहिले. पुन्हा पहल्यापासून चर्चा होऊ लागली. लोग आपसातच सवाल-जबाब करू लागले.

"केशाच्या घरात शिरलाच कसा?

"केशा जपला. सामसूम झालेली चोरानं पाहिली व कौलं बाजूला करून चोर कुदला!"

"कौलांची खळबळ झाली तरी केशा जागा कसा नाही झाला!"

"मानूस-सवसार आहे. लागती जप!"

"केशा जपला. एक जप झाली की नाही झाली. तसा धपकन आवाज झाला. केशा बघतो तर समोर सुरा घेऊन चोर उभा!"

"काय रे केश्या?"

चोराच्या हातात सुरा नव्हता हे केशाला सांगावसं वाटलं पण तो काहीच बोलला नाही. नुसती मान हालवली.

"मग पुढं काय झालं?"

"मग केशानं कडी काढली व घराबाहीर सटकला. काय रे केश्या?

"तेव्हाच का नाही धरलं चोराला?"

"सांगतो ना सुरा दाखवला म्हणून!" कुणीतरी केशाची बाजू घेतली.

"आम्हाला तरी बोलवायचं! शेजारी म्हणतात कशाला? आम्ही तर केव्हाचे जागेच आहोंत!"

"चोर घरात आहे ही पक्की खात्री आहे ना तुझी?"

"खात्री असल्याबिगर तो सांगनार व्हय्! त्याला हौस आली काय बालबच्चे घेऊन सळकीवर उभं राहायची?"

"सावध...."

लोक पुन्हा पहिल्यापासून सावध झाले. आता चोर येणार यात शंकाच नव्हती.

"दिसला...?" एक आवाज.

"व्हय!"

"कसा आहे?

"तुझ्या सरकाच आहे. तयार राहा!

"एक आहे कि तीन चार? दुसरा आवाज.

"एकच आहे...वाटतं!"

"काय करून राहिला आहे इतका वेळ?"

"तुझ्यासाठी सिरापुरी करून राहिला आहे, गप बैस जरा!"

"तूं आधीकपना करूं नको, खाली उत्तर मग दाखवतो!"










"तूंच ये वर जरूर आसली तर !"

"ए उगाच आपसात तंटू नका चोराला काठ्या टोचून बाहीर काढा आधी !"

"ए पाव्हन्या, बाहीर नीघ, उगाच मानपान घेऊ नको !"

"चोर एक नाही कि दोन नाही ! आक्षर काढत नाही !"

"बाहीर येतो का मुकाट्यानं ! का उतरूं खाली ?"

"भिवसन्या खाली उतरूं नको. खाली-पिली हाराम मौतानं मरशिल, त्यापेक्षा वरून दगड मारून चोराला सतव !" एकानं सल्ला दिला. सपासप पंच-पन्नास कौलं घरात फेकली गेली. तसा केशा पुन्हा कळवळला. "फार नुकशानी करूं नका रे बाबानो !"

"केश्या घर तुझं नाही, तूं भाडेकरूं; कशाला चिंता करतोस ?"

"पन केशाची गैरसोय होईल ना !"

"तूं मध्ये पडू नको ! . . .केशा व त्याचा घरमालक पाहून घेईल !" चोर हूँ नाहीं कि हा नाही ! मांजर झाप झाली. कावळे ओरडू लागले. पण चोर बाहीर येन्याचं लक्षान दिसेना !

"आसा हाट्टी चोर आपन बघितला नाही बां !"

कंदीलं विझली. वॅट्या खलास झाल्या. कौलावरचे लोक खाली उतरले. कुत्रे आप आपल्या राहात्या गल्लींत निघून गेले. चोर दिसेना, गर्दी हाटेना !

शहाणे लोक दरवाजाभोवती काठ्या घेऊन जमा झाले. सुकदेव पहेलवानानं दरवाजा उघडला. तसा पुन्हा कलबलाट माजला.

"मागे व्हा चोरांजवळ सूरा आहे...!"



"जीवावर उदार झाला आसल !"

पुढे शिरणारे दोन हात मागे सरकले.

"गोडी गुलाबीनं घ्या !"

"कोण आहे रे आत ?"

". . . . . . . . . ."

"बाहीर ये, आम्हीं तुला मारनार नाहीं !

"आवाज नाही !"

"आमच्या शब्दावर इस्वास ठेव, इनंत्या करायला लावूं नको बाहीर ये !"

"सांगशीन त्याची आन घेतो, तुला मारनार नाहीत !"

"तुझ्या केसाला कोनी हात लावला तर आमचा कान धर !"

आवाज नाही ! . . .

"बाहीर नीघ, तुझ्या पाया पडतो !"

"पाया कशाला पडतो, हम्बा पाडीन म्हन की रं ! चोराच्या कोनी पाया पडतो काय रं ? बांगड्या भर त्यापरी !"

"तुला मधी बोलायला काय झालं ? आम्ही त्याला गोडीगुलाबीनं बाहीर काढायला बघतो तर तूं मध्ये का तोंड घालतो ? तुझ्या मनगटात जोर आहे तर मागे का लपून राहिलास भागूबाईसारखा ?"

"तुम्ही दाखवाना मर्दुमकी !"

"तूं इथून जा माझ्याशी गाठ आहे लक्षात ठेव !"

"तुझ्यासारखे छप्पन गेले बाराच्या भावात, घमेंड करूं नको ?"

आता या दोघांची धरठोक होणार तेवढीच घटकाभर करमणूक अशा विचारानं गर्दीतले लोक माना वर करून पाहू लागले. पायाना जागोजाग चिलटं चावत पन जुमानत ना ! शेवटी दोघांनी रामपहारांत बरीच शिवीगाळ केली. मारामारी झालीच नाही.

इतक्यांत केशाच्या घरामागून मोठा दांगळो उसळला. तोबा गर्दी उसळली. "महादेव शावकाराच्या घरात चोरी झाली !"

"काय, काय गेलं ?"

"सगळंच गेलं म्हणतो, छाती ठोकतोय् चला !"

"आस आसलं तर मग गेलंच पाहिजे !"

समदे लोक केशाच्या घरामागे गेले. शावकाराची मागची भिंत आनि केशाची मागची भिंत दोन हाताच्या अंतरावर आहे. जाण्या येण्याला रस्ता नाही. पूरी गल्ली तुडवून जावं लागतं !

चोरी महादेव शावकाराच्या घरात झाली आनि आपन पाहारा केला केशाच्या घरावर ! याचा लोकांना राहून राहून पसतावा होऊ लागला.

लोकानी महादेव शावकाराला चौफेर घेरला. सवाल जवाब सुरूं झाले !

"भिंत फोडली तेव्हां तुम्ही कुठे होता, घरातली मंडळी कुठे होती ?

"आम्ही समदे धाब्यावर झोपतो ?"

"केशाकडे पन चोरी झाली ना !"

"मला माहित आहे ते ! कौलाचा आवाज होताच मी जागा झालो तेव्हांचा जागाच आहे. आता खाली उतरलो बघतो तर आपलं पण नशिब फुटलेलं..." महादेवाच्या डोळ्यात पाणी आलं. त्याची बायको गळा काढून रडू लागली. महादेवाची बूढ्ढी तळतळाट करूं लागली.

"बहुतेक आसं झालं आसल . . . .!"

"काय सांग ना !"

"चोरी करून चोर गांगरला आसल. चाहूल लागल्यावर तो घरावर चढला. काय ? आनं, पाय घसरून पडला !"

"चोर काय गांगरायला बसलाय् ? त्यानं जाता जाता केशाच्या घरी पण चोरी केली. माहित आहे ? एकदम दोन घरं फोडली."

"चोर एक नसल ! टोळी असल बहुतेक !"

नाना तऱ्हेचे तर्क सुरू झाले. सगळे लोक महादेव सावकाराला काय काय गेलं म्हणून खिजवूं लागले.

चोर कोन आसलं म्हणून अनेकांची नांव संकेतानं घेतली गेली.

इकडे केशा पुन्हा एकटाच पडला. आता फार वेळ गल्लींत उभं राहणं बरं नाही म्हणून जीवावर उदार होऊन त्यानं आंत डोकावलं ! चोर दिसेना ! हिंमत करून घरात शिरला. कोपरा-कोपरा शोधला. कणग्या बरण्या शोधल्या, पर चोर दिसलाच नाही. घरभर उकीरडा माजला होता. आंथरूनं तसीच पडलेली होती ! बिचारा केशा आपल्या घराची किती नुकसानी झाली याचा आदमास करूं लागला. बायको

आत आली. कौलांचा ढिगारा बाजूला करून पाय ठेवायला जागा केली. इतक्यात ठणकन् आवाज आला तसी ती वाकली. वघता वरोवर तिची पुन्हा वत्तीशी वाजूं लागली व ती मटकन् जागच्या जागीच वसली.

"वसून काय राह्यली, घरातला उकीरडा तुझा वाप उचलल का ?" केशा संतापला. त्याच्या वायकोनं त्याला खूण करून जवळ वोलावलं ! वायकोनं दाखवलेलं गठड वघतांच त्याला पन कांपर भरलं. दोघे जण एकमेकाकडे वघत राहली.

केशा भानावर आला. त्याने सपासप पोरांच्या पाठीवर तडाखे हाणले व त्य.ना वाहेर पिटाळून लावले. वायकोला खूण केली.

"चोरानं सगळं घर दार धुवून नेलं !" म्हणून तिने गल्लीत जावून आकांत मांडला.

केशानं सगळ्या सामानाची वांधावांध केली. गावात गेला भाड्याची वैलगाडी केली. घरमालकाच भाडं दिलं व रडून म्हणाला "दादा तुमचं घर सांभाळा, मी गरीब मानूस आज पूरा कंगाल झालो. जहेर खायला पैसा नाही ठेवला चोरानं !



**फॅशन**

उडवीत टांचा  
सडकेवरती  
नकोस हलवूं  
कंबरडे  
जखमी थकले  
डोळे बघतील  
चष्मा उतरुन  
तुझ्याकडे

**सुगरण**

मीठां मुळे खारटले  
भाजींतले कण कण  
कसा म्हणू तुला प्रीये  
"त्यांतली" तूं सुगरण

—कल्याण इनामदार

आतां या गांवांत माझा निभाव लागनार नाहीं. वाट फुटेल तिकडं जातो मी. कुठं वी कष्ट करूं; नी पोट भरूं !"

दुपारच्या टायमाला सगळे लोक घरोघर भाकर तुकडा खायला गेले.

केशा सामान गाडीत टाकत होता व शेजारी कसे करमकसाई आहेत, हे मोठ-मोठ्यानं ओरडून सांगत होता ! त्याची बायको चोरानं सगळं घरदार लुटलं, म्हणून कलवला करीत होती. उपाशी पोरं कोकलत होती.

दोन मानस गोळा होऊन केशाला "जेवण करून तरी जा !" म्हणून आग्रो करू लागली.

"या गावात मी आतां घोटभर पानी सुद्धा घेणार नाही." असे म्हणून केशानं गाडीवाल्याला गाडी सुरूं करायला सांगितलं. व गाववाल्यांना शिव्या देतं गाडीमागून चालूं लागला.

गरीवांचं फार नुकशान झालं, आडचा वक्ताला एकमेकांच्या उपेगी पडलं पाहिजे म्हणून गाव गल्लीतले लोक एकमेकांना उपदेश करूं लागले. ●●●





# अग्निदिव्य

—सुनीता क्षीरसागर

सूरवेड्या दौलतनें 'वाहवाऽ' अशी दाद दिली. आणि शहाजादीची प्रीत त्याच्याकडे जणुं मृत्यूच्या पाऊलवाटेनें चालत आली



**रविराज** आपल्या सारथ्याला घरीं परत जाण्याची घाई करूं लागले होते. पक्षी केव्हांच आपल्या घरट्यांत जाऊन आपल्या बायकामुलांशीं शिळोप्याच्या गप्पा मारीत होते. राजवाड्याभोवतीची बाग फळाफुलांनीं नुसती डंवरली होती. सारा महाल रविराजाच्या किमयेने भरून गेला होता—आणि अशा वेळीं शहेनशहाची लाडकी बेटी रोशनआरा आपल्या बगीचांत बसून सखीचे गायन ऐकत होती. पूरिया—धनाश्रीचा फुलोरा फुलला होता. सर्व सख्या देहभान विसरून स्वर न् स्वर पीत होत्या. तेवढ्यांत एका ताननंतर 'वाहवाऽ, बहोत खाशी' असा पुरुषी स्वर ऐकूं आला. सख्यांसह रोशनआराने चमकून आवाजाच्या दिशेनें पाहिलें. आणि तिची मान लाजेने खालीं झाली. तिच्या हृदयांत धडधडूं लागले. तिची स्थिती "एकदांच पाहिलें, पाहिलें, अन् त्या क्षणींच आपुली न राहिलें" अशी झाली. कोणी एक राजबिंडा मुशाफीर गाणं ऐकण्याची चोरी करतांना पकडला गेला होता. सर्व जणी एकदम थांबलेल्या पाहून तो पण भानावर आला आणि क्षणांत अदृश्य झाला.

सारी रात्र रोशनआरानें जागून काढली. झोंप हराम झाली आणि चंद्रानें वैर साधलें. त्या गुलनार आशिकानें तिला पुरतं हैराण केलं होतं. एवढा जिवाला चटका लावून गेला—पण स्वतःचं नांव विचारायचीसुद्धां फुरसत त्यानें ठेवली











अनुक्रमणिका

नाहीं, आणि याचंच तिला फार वाईट वाटत होतं. कशातच तिचं लक्ष नव्हतं. आपल्या कन्येला दिवसभर उदासीन पाहून तिच्या अब्बाजाननी तांतडीने राजवैद्याला बोलावणं धाडलं. पण मदनाचा रोग यःकश्चित वैद्याला कसा कळणार ! तरीहि त्याने कसली तरी मात्रा उगाळून दिली आणि राजकन्येची रजा घेतली. तिला तेंच हवं होतं. सक्त एकांत आणि आपल्या प्रियकराचं चिंतन. संध्याकाळची वाट पहाणं.

आज तिने सखीला ठुमरी गायला लावली. 'क्या करूं सजनी–आये न बालम्' आणि त्याचबरोबर त्या चोराला आपल्या अत्यंत विश्वासू नोकरांकडून पकडायची खबरदारीहि तिने घेतली. चक्रवाकीसाठीं घायाळ झालेल्या चक्रावाकासारखा तोहि गाणं ऐकायला आला. झालं ! राजकन्येचं काम झालं. त्या चोराला पकडून शहाजादीसमोर उभं केलं गेलं. आणि शहाजादीला खास मर्दानी शिक्षण देण्याची त्याला सजा दिली गेली.

दिवस क्षणाच्या गतीने जाऊं लागले. रोशन टवटवीत झालेली पाहून शहेनशहाहि राजवैद्याच्या कौशल्यावर खूष झाले आणि त्याला चार हजार होनांची बिदागी मिळाली. नवीन ठेवलेल्या बंद्याकडून राजकन्या नेमबाजीचे शिक्षण घेऊं लागली आणि तिचेहि शरसंधान सुरूं झाले.

एक दिवस दोघेहि जंगलात शिकारीसाठी गेले. राजकन्येने चुकून एका रतिक्रीडेत मग्न असलेल्या हरिणीला मारले आणि काळवीटाचा आक्रोश पाहून तिच्याहि डोळ्यात अश्रू तरारले. पण दौलत–तिचा बंदा–त्या दृश्याकडे पाहून हसूं लागला. आणि तिला कळले कीं, तिची निवड चुकीची आहे. पण ती अशी हार खाणारी नव्हती. मन चाहेल ते मिळविण्याचा तिचा स्वभाव होता. तिने आपले जाळे अधिक वेगाने आणि उघडपणे विणायला सुरुवात केली. श्रृंगारिक ठुमरी गझलांचा आपल्या प्रियकरावर तिने पाऊस पाडला.

वसंत ऋतूतल्या एका संध्याकाळी तिने बागेत मुद्दामच दौलतला बोलावून घेतले. सगळीकडे आम्रवृक्षाच्या मोहोराचा मादक गंध सुटला होता. फुलपाखरं फुलावरून बागडत होती. तिने मदभऱ्या आवाजांत हाक मारली—'दौलत'—

'क्या खाविंद ?'

'तुला माझं मन समजत नाहीं का रे ?'

'खाविंद, आपण काय म्हणतां ? आपले चरण मला परमेश्वरासमान पूज्य आहेत.'

'दौलत, मी तुझ्या प्रेमाची भुकेली आहे रे ! मला तुझी मुहब्बत हवी आहे !'

'क्या कहा खाविंद आपने ?'

'मुहब्बत.' त्याचे डोळे विस्फारले.

आपल्या नशिबी हें भाग्य असेल अशी त्या अडाण्याला कल्पनाहि नव्हती. आणि हे कसं शक्य होतं ! तो हिंदु, ती मुसलमान. तो सामान्य नागरिक, ती राज्यकर्त्याची मुलगी. आणि या फरकामुळेच त्याने आपल्या भावना दाबून टाकल्या होत्या. पण आता खुद्द शहाजादीने पुढाकार घेतला होता. तो मुळी फुलून आला. झरझर त्याला राजकन्येच्या वागण्याचा उलगडा झाला. पुरुष आणि प्रकृतीचं मीलन झालं. संगीताच्या संगतीत श्रृंगाराला सारी रात्र अपुरी पडूं लागली.

वजीराचा बेटा सल्तनत दक्षिणेत फार मोठी मर्दुमकी गाजवून आला होता. आणि त्याचा 'शेर-अे-दख्खन' हा किताब देऊन गौरव केला गेला. आपली लहानपणची सहेली आणि मानसदेवता रोशनला भेटायला एका संध्यासमयी शेर-अे-दख्खन सल्तनत रोशनच्या महालात अचानक आला. आणि समोरचे दृश्य पाहून त्याने रागाने दाताखालीं ओठ इतक्या जोराने दाबला कीं, त्यांतून रक्त फुटलं. जिची हृदयात रोज पूजा केली, प्रत्येक पराक्रम मनोमनी जिला वाहिला ती एका कमअस्सल लवंडयाच्या बाहुपाशात पाहून सल्तनत रागाने हिरवापिवळा झाला. झपाट्याने तो शहेनशहाकडे गेला आणि त्याने पाहिलेला अनर्थ कथन केला.

'सल्तनत, कोणाविषयीं काय बकतोस, कल्पना आहे का ?' शहेनशहानीं चढत्या आवाजात विचारले,

'खाविंद, एक शब्द खोटा असेल तर तिथल्या तिथे माझं शिर कलम करा'.

तरीहि शहेनशहाचा विश्वास बसेना, अखेर पोरगी जातीवरच जावी ना ? शहेनशहाच्या आवडत्या दासीची ती बेटी होती. पण त्या दासीने शहेनशहाशीं बेईमानी केली म्हणून त्याने तिचा काटा काढला होता आणि ही गोष्ट काहीं थोडी माणसं सोडल्यास कोणालाच माहीत नव्हती. अखेर बादशहाने स्वतःच खात्री करून घ्यायचे ठरवले. दुसऱ्या दिवशी ठीक त्याचवेळीं तो गुपचुप शहाजादीकडे गेला "या अल्ला, परवरदीगार ! मी हे काय पाहतो आहे ! माझी प्यारी बेटी एका काफिराच्या मिठीत?"

शहाजादी रोशनआरा ते बोल ऐकून चमकून उठली. आपल्या पित्यावर तिचा भरौसा होता. पण आपलं मन तो जाणणार नाहीं याचीहि तिला खात्री होती.

लगोलग दौलतला कैद केलं गेलं. आणि शिरच्छेदाची शिक्षा फर्माविली गेली. ही बातमी ऐकून सल्तनत तातडीने बादशहाकडे गेला.

'खाविंद, एक अर्जी आहे."

'क्या है बेटा ? बोलो– घबराने की कोओी बात नहीं."

'मी ऐकलं कीं, आपण त्या काफर दौलतला मौतची सजा दिली ?'

'खरं आहे ते.'

'पण, खाविंद, असं केलं तर ?'

'कैसा ? बोलो बोलो.'

'मला वाटतं कीं, दौलतसारख्या हुशार लढवय्याला नाहक मारण्यापेक्षा शहाजादीची ती खूबसूरत दासी आहे ना–ती त्याला द्यावी. नाहीतरी तो संगीत वेडाच आहे. पण एका अटीवर. मी जंगलात जाऊन एक वाघ जिंदा पकडून आणतो. त्याला दोनतीन दिवस काहीं खिलवूंच नये. नंतर एके दिवशीं दवंडी पिटवून शतरंज मैदानात दोन बंद कमऱ्यात, एकात तो भुकेला वाघ व दुसऱ्यात ती खूबसूरत दासी ठेवावी. त्याच्या नशिबाने दासी असलेला दरवाजा उघडला गेला तर तिच्याशी त्याचा निका








लावावा आणि जर तो वाघ असलेला दरवाजा उघडला गेला तर शहाजादीला बदनसीब करणाऱ्या काफराचा अनायासेच नायनाट होईल."

'बहोत खाशी, बहोत खाशी, शेरे दख्खन' बादशहा खूप होऊन म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सल्तनत खूप मोठा लवाजमा व शेर पकडण्यासाठी भला-मोठा पिंजरा घेऊन जंगलांत गेला. मोठ्या हिकमतीने व बहादुरीने त्याने शेराला पकडले. खरंच तो नशीबवान म्हणायचा. कारण रात्रीं त्याने बांधलेल्या रेडयाच्या आशेने शेर आला आणि त्याने लावलेल्या सापळयांत अडकला. वाजतगाजत तो शेर राजधानीत आणला गेला.

गावात दवंडी पिटली गेली. उद्या लोकांना एक अनोखा खेळ पहायला मिळणार होता. सल्तनतला राहवेना, त्याने मुद्दाम जाऊन शहाजादी रोशन-आराला ही बातमी सांगितली.

घतरंज मैदानावर लोकांचे थवेच्या थवे लोटत होते. आज त्यांना एक अनोखा खेळ पहायला मिळणार होता. मदानाचा कोपरान् कोपरा माणसांनीं फुलून गेला होता. सर्वांचे डोळे बादशहाच्या शामियान्याकडे लागले होते. केव्हां एकदां बादशहा येतो असे त्यांना झाले होते. बादशहाचा शामियाना उत्तम प्रकारे सजवला होता. मधोमध बादशहाचे सिंहासन होते. त्याच्या शेजारींच त्याच्या लाडक्या शहाजादीचे आसन व त्यांच्यामागे आणि आजूबाजूला इतर मानकऱ्यांचीं आसनं होतीं. गुलाबपाण्याचा सगळीकडे घमघमाट सुटला होता. सारं वातावरण कसं खुशबूदार आणि उत्साह-वर्धक ठेवलं होतं. अखेर एकदाची ललकारी उठली––बा–अदब बा मुलाहिजा खास उल् खास जू अल शहेनशहा पधार रहे हैं।"–सर्वांच्या नजरा दरवाज्याकडे वळल्या. तुताऱ्या वाजत होत्या. एवढ्यात आवाज आला 'खडी ताजिम–निगाह रक्खो' आणि त्या पाठोपाठ बादशहा, शहाजादी यांनीं मंद पावले टाकीत मैदानात प्रवेश केला. 'आस्ते कदम, आस्ते कदम'च्या इशाऱ्यावर शाही मंडळींनीं शामियान्याकडे कूच केले. शहेनशहा, शहाजादी, शेरे दख्खन आणि अशीच बडी-बडी मंडळी स्थानापन्न झाली.

मैदानात मधोमध दोन दिवसात मजुरांनीं खपून दोन बंद खोल्या बांधल्या होत्या. लगेच दौलतला सुटा करून आणला गेला.–शेरे दख्खन तिरक्या नजरेने शहाजादीकडे बघत बोलायला उठला—

"शूर, लढवय्ये दौलतखाँ, आज आपकी इम्तिहान हैं। आपण या गादीचा घोर अपमान केलेला आहे, पण खाविंदानीं दयावंत होऊन आपणाला एक मामुली सजा दिली आहे. हे समोर जे दोन कमरे दिसत आहेत त्यापैकीं एका कमऱ्यांत स्वरूपसुंदरी आहे व दुसऱ्या कमऱ्यात भुकेला वाघ आहे. आपण पुढे होऊन एका कमऱ्याचे दार उघडावे, जर स्वरूपसुंदरीच्या कमऱ्याचे दार उघडले गेले तर आपला तिच्याशी निका लावला जाईल आणि जर दुसऱ्या कमऱ्याचे दार उघडले गेले तर काय होईल ते आपण जाणताच." आणि छद्मीपणाने हसत तो खाली बसला.

दौलत केवळ शहाजादीकडेच बघत होता. शहाजादीच्या हृदयाला लाख इंगळ्या डंसल्या. ज्याच्यावर आपल्या प्रतिष्ठेची पर्वा न करता प्रेम केले तो आपल्याच एका दासीचा मालक व्हावा या कल्पनेनेच तिला वेड लागायची पाळी आली. एक हा तरी निकाल होता किंवा आपल्या प्रियकराचा भयानक मृत्यू आपल्या डोळ्यांनीं पहावा लागणार होता. तिच्या हृदयात तुमुळ युद्ध चालले होते–खरी प्रिया यावेळीं कशी वागेल? त्यातच भरीला भर म्हणून सल्तनत मिशावरून हात फिरवत तिच्याकडे पाहून हसत होता. अभावितपणे तिचा एक हात जरासा हलला आणि तेवढयानेंच प्रभावित होऊन दौलत पुढे सरकला. त्याच्या देवीचा कौल त्याला मिळाला होता. सर्वजण श्वास रोखून दौलतच्या हालचाली पहात होते. एक क्षण गेला, दोन क्षण गेले. दौलत निम्मे अंतर काटून गेला. शहाजादीचे हृदय जोरजोराने धडधडूं लागले. सल्तनतने अशा प्रकारे सूड घेतला होता तर! तिला वाटलं, त्याला थांबवावं. सल्तनतची इच्छा पूर्ण करण्यासाठीं ती स्वतःच स्वतःचं बलीदान करायला तयार झाली. पाव अंतर उरलं होतं. निर्णय घ्यायला थोडा अवधि उरला होता. तिची प्रतिष्ठा तिला तिच्या निश्चयापासून परावृत्त करीत होती तर तिचं प्रेम तिला स्वस्थ बसूं देत नव्हतं. ती निश्चय करून उठली–'थांबा' म्हणून ओरडणार, एवढ्यांत दौलतने एका कमऱ्याचे दार उघडले. वाघाच्या डरकाळ्यांनीं मैदान भरून गेले आणि शहाजादी बैठकीवर कोसळली. सल्तनत आणि बादशहा यांनीं हातमिळवणी केली. ●●●










## कलात्मक व प्रामाणिक चित्रण

**'हुंकार'**—वसंत पुरुषोत्तम काळे यांच्या बारा कथांचा हा संग्रह आहे. प्रस्तुत संग्रहांतील जवळ-जवळ सर्वच कथांचा शेवट हुरहूर लावणारा, चमत्कृति निर्माण करणारा किंवा वाचकांच्या विचाराना धक्का देणारा आहे. कथा वाचनानंतर एक गोष्ट प्रामुख्याने जाणवते ती अशी की, लेखकाने केलेले चित्रण प्रामाणिक आहे. ज्या जीवनात ते वावरतात त्या जीवनात टिपलेल्या अनुभवांचे नि व्यक्तींचे चित्र त्यांनी कलात्मकतेने व रसिकतेने चितारलेले आहे. अत्यंत साधे-सुधे प्रसंग देखील लेखकानी फार कौशल्याने हाताळले आहेत.

संग्रहातील अनेक कथांतून 'पुरुष' या विषयासंबंधी काही विचार सहजतेने प्रगट झाले आहेत. वासना न आवरू शकणारा पुरुष 'चक्रम'मध्ये भागवत मास्तरांच्या रुपाने अवतरतो तर 'स्वर' या कथेतून ही 'पुरुषी' वृत्ति पुष्पा शाळिग्राम हिच्या मुखातून वदलेली आहे. ती म्हणते "एकदा पुरुषाच्या वासनेनें उसळी खाल्ली म्हणजे नाना, त्याला फक्त 'स्त्री' हवी असते. मग ती कशी कां असेना. आता माझ्यासारखी (म्हणजे अत्यंत काळी व कुरुप) मुलगी त्याला वेडं पिसं करू शकत होती, ह्यांतच नाही कां सगळं आलं ?" किंवा "थोडासा अनावर झालेला पुरुष असला म्हणजे आपल्याला खेळवणारी बाई सुंदर आहे की कुरुप आहे ह्याचाहि विचार करण्याच्या मनस्थितीत तो नसतो."

पुरुषांची ही पुरातन कालापासून प्रसिद्ध असलेली मधुकर वृत्ति 'पहिली खेप' या कथेत घाटे या व्यक्तीच्या द्वारे फारच तरलतेने व चातुर्याने चितारली आहे.

व. पु. काळे यांची कथा प्रसंगांपेक्षा व्यक्तीलाच प्राधान्य देते आणि म्हणूनच प्रत्येक कथेच्या वाचनानंतर एकेक व्यक्ति आपल्या डोळ्यासमोर तरळते. काही व्यक्ति तर आपल्या मनावर फारच चांगला व कायमचा ठसा उमटवतात.

'चक्रम' या कथेतील थंड प्रकृतीची व खूपच समंजसपणे व व्यापकपणे विचार करणारी गृहिणी, 'त्याचा येळकोट राहिना'-मधील श्रीमंत व प्रतिष्ठित होऊन देखील लहान सहान चोऱ्या करणारा कमलाकर, सामान्य कारकुनाचा अधिकारी झालेला कांता नि त्याची सुरुवातीला अळीसारखी असलेली पण कालांतराने तक्षकासारखी झालेली खावूगिरीची संवय, 'पोरकी' या कथेतील गोपाळकाका तर अत्यंत अविस्मरणीय आहे. 'निरोप' या कथेतील अप्पा सोमण नि गजा सोमण दोघेहि वाचकांच्या मनांत सहानुभूतीयुक्त स्थान पटकावतात. 'कैफ'मधील विजयचे वडील चेहऱ्या-मोहऱ्याने निराळे आणि थोडे विक्षिप्तहि म्हणून लक्षात राहतात. 'स्वर'मधील पुष्पा शाळिग्राम रंगामुळे, व्यवहारीपणामुळे आणि बुद्धि व आवाजामुळे वाचकाला विसरता येत नाही. 'हुंकार'च्या वाचनानंतर वरील व्यक्तींच्या विश्वात वाचक गुंगून जातो.

'पोरकी', 'निरोप' व 'पहिली खेप' या कथा फारच सरस वाटतात. वाचकाला काही काळ त्या अस्वस्थ करतात. मानवी जीवनातील विसंगती नि कारुण्य त्या प्रभावीपणे वेचतात. निर्णय ही कथा निराळया छापाची म्हणून लक्षात राहते. 'माई,' 'उर्मिला' व 'नीलकंठ' ही सर्वच मंडळी वेगळचा जगातली वाटतात. कथावस्तु कल्पना म्हणून ठीक आहे. परंतु ती प्रत्यक्ष जीवनानुभवाशी फारशी समांतर आहे असे वाटत नाही. वरील कथांच्या मानाने 'हुंकार', 'तो वाट पहात असेल' इत्यादि कथा क्रमाने व गुणाने डाव्याच ठरतील.




**हुंकार ● मराठी कथाः १९६३**

वसंत पुरुषोत्तम काळे यांच्याबद्दल अधिक अपेक्षा निर्माण करणारा हा त्यांचा 'हुंकार' आहे.

[**हुंकार**—(कथा संग्रह) लेखक—**व. पु. काळे** श्रीराम प्रकाशन, मुंबई नं. २]

**—प्रा. वि. द. संत**

## नव्या-नव्या जीवनानुभवांचा शोध

**१९५९** पासून त्या त्या वर्षातील उत्तमोत्तम ११–१२ कथा एकत्रित करून कथावार्षिक प्रसिद्ध करण्याच्या योजनेतील हे शेवटचे व पांचवे पुष्प होय. यातहि संकल्पाप्रमाणे १२ कथा निवडलेल्या आहेत. व या संग्रहाचे संयोजक सुप्रसिद्ध कथालेखक श्री. अरविंद गोखले हेच आहेत.

मासिकांची व कथालेखन करणाऱ्या लेखकांची वाढलेली संख्या आणि कोणी कोठे लिहावे यांस न राहिलेला धरबंध यामुळे कथा निवडण्याचे काम श्री. अरविंद गोखले यांनी म्हटल्याप्रमाणे खरोखरच मोठे कठीण आणि जिकिरीचे आहे. परंतु श्री. गोखले यानी हे काम फार चांगले नि चोख बजावले आहे. यामुळे सामान्य मराठी वाचकाचे, निवडक नि दमदार कथा हुडकण्याचे श्रम वांचले आहेत.

या संग्रहांत आलेल्या बहुतेक सर्व कथा व्यक्तिप्रधानच आहेत. नव्या नव्या जीवनानुभवांचा शोध मराठी कथा किती समर्थपणे

घेत आहे याचा साक्षात्कार या संग्रहामुळे घडतो. व्यक्तिमनाच्या भाव-भावना-संवेदना यांचे कोपरे नि कोपरे, नव्या-नव्या आणि दमदार प्रतिमांद्वारे, मराठी कथा किती कलात्मकतेने चितारते याचे मनोज्ञ दर्शन या संग्रहाद्वारे आपणास घडते. मनोविश्लेषणाच्या प्रांतातहि मराठी कथेने प्रगतीची पावले टाकली आहेत. पूर्वीच्या कथांच्या मानाने त्या अधिक शुद्ध व शास्त्रीय वनत आहेत. प्रादेशिक कथा या संग्रहात दोन-तीनच आहेत पण त्यांत प्रादेशिक वैशिष्ट्यांच्या रंगांबरोवरच मानवी व्यापक भावांचाहि सुगंध दृष्टिस पडतो. सेक्स संबंधी विश्लेषण पुष्कळ कथांतून आलेले आहे. हा विचार विविध रंगानी 'पुरुष', 'अंजू', 'वेडुक', 'रुक्मिणी', 'माघारी', 'गाठोडे', 'खिस्त-जन्म' इत्यादि कथांत प्रामुख्याने येतो पण कोणत्याहि लेखकाचा तोल सुटलेला नाही.

'पुरुष' ही जी. ए. कुळकर्णी यांची कथा. यांत एकाच वेळी सौ. तारा आणि कु. कुमा यांना प्रेमाच्या नाटकांत झुलवणारे प्रा. निकम नि भोळसट, गोगलगाईसारखा व लेखक होण्याचा ध्यास घेतलेला विश्वनाथ या व्यक्तिरेखा फारच चांगल्या रेखल्या गेल्या आहेत. अत्यंत सहजपणे ही कथा वाटचाल करते.

या संग्रहात आलेल्या बहुतेक कथांत हा गुण आहे. पट्टीच्या नि सराईत गवयाने आपल्या सुरांच्या काही आलापातच जसे वातावरण धुंद व संगीतमय करावे तसेच हे सर्व लेखक वाचकांना धुंद वातावरणात नेतात. व काल्पनिक विश्वात उभे करतात.

'अंजू' ही कथा चि. त्र्यं. खानोलकर यांची. अंजू, तिची आई, तिचे वडील आणि मृत भाऊ अवि याच्या स्मृति ह्यांच्या विश्वाचे चित्र रेखाटलेले आहे. हे रेखाटन अत्यंत भावस्पर्शी झालेले आहे. जरी शीर्षक अंजू असले तरी अंजूची आई हीच यांतील प्रमुख व्यक्ति. अंजूने कुंडीत लावलेल्या बियांना येणारा कोंब व तिच्या आईला दिवस गेल्याची जाणीव हे सारं रुपकातून मोठ्या समर्थपणे साकारले गेले आहे.

'शपथ' ही अरविंद गोखले यांची कथा. मराठी कथेच्या प्रांतात गोखले यांनी खूप यश मिळविले आहे. ह्या कथेतहि त्यांच्या लेखन सामर्थ्याचा प्रत्यय येतो. पतीच्या विवाहपूर्व प्रेमाचा सुगावा लागल्याने क्षीण झालेली व मरताना विचित्र शपथ घालून संसारातून उठलेली अंबिका, तिच्या निधनाचे दुःख विसरून व शपथेचे जोखड दूर टाकून मालिनीशी रमणारा हृषिकेश व अंबिकेची शपथ ऐकून त्याच्या जीवनातून सर्व मोह ठेऊन बाजूस निघून जाणारी मोहिनी या तिघांचे विश्व यात आहे. प्रभावी व्यक्तिचित्रणाधारे चित्रित केलेल्या कथाविश्वात वाचकाला नेऊन धुंद करण्याचे श्री. गोखले यांचे सामर्थ्य याहि कथेत प्रत्ययास येते.

'वेडुक' ही विजय तेंडुलकर यांची तर 'रुक्मिणी' ही जयवंत दळवी यांची कथा. दोन्ही लेखक मान्यता पावलेले नि दमदारपणे लेखन करू शकणारे. 'वेडुक' जयाचे गर्भपाताची वेकायदा ऑपरेशन करणाऱ्या डॉ. जे. के. दंडवत्यांत झालेले रुपांतर यांत समर्थपणे रेखाटले आहे. 'रुक्मिणी' या कथेतील विठ्ठलरावांबद्दल वाचकाच्या मनांत फारच मोठी सहानुभूति निर्माण होते.

'खडक चाफा' या कथेतील गंधवेडी 'ती' आणि 'खिस्तजन्म' या कथेतील गंभीर समस्या निर्माण करणारी 'अनिता'. ह्या दोन्ही कथांतील वातावरण खूपच वेगळे आगळे आहे. 'परदुःख' ही श्री. दा. पानवलकरांची कथा देखील त्यांचे कथालेखन नैपुण्य पटवून देणारी आहे. परदुःखाला स्वतःचे दुःख मानणारा व स्वतःच्या दुःखाने होरपळून निघालेला विश्वनाथ वाचक विसरू शकणार नाहीत.

'ओला दिवस' ही पु. भा. भावे यांची कथा. पावसाच्या सरीबरोवर ४९ पावसाळे पाहिलेल्या एका माणसाच्या मनाची नितळ अंदोलनं या कथेत मनोरमतेने रेखाटली आहेत. पूर्णपणे मनोविश्लेषणात्मक अशी ही एकच कथा या संग्रहात आहे. बाकीच्या कथात मनोविश्लेषण नाही असे नाही पण ते प्रसंगानुषंगाने आलेले आहे. सुप्तमनांत आईबद्दल असलेला आदर-प्रेम जागे होते. बाहेरच्या सृष्टीप्रमाणे त्याचे मनहि आईच्या आठवणीनी आर्द्र होते, कमालीचे मृदु होते व 'ओला दिवस' या शीर्षकाची सार्थकताहि पटते.

'माघारी' 'गाठोडे', (आणि 'वणवा' देखील) या प्रादेशिक कथा. माडगूळकर आणि दि. बा. मोकाशी यानी याहि पेक्षा कितीतरी अधिक समर्थ कथा लिहिलेल्या आहेत. त्यामानाने ह्या दोन्ही कथा समाधान देत नाहीत. बळीराम कोष्टी व सैली नायकिण हे 'गाठोडे' मधील आणि 'सरस्वती', 'हरिभाऊ' हे 'वणव्या'तील चेहरे मनावर ठसतात.

'माघारी' ही बा. रं. बोराडे यांची प्रादेशिक कथा त्यामानाने फारच सरस वाटली. भाषा, माणसं, वातावरण, प्रसंग या सर्व कसोटीना ती प्रादेशिकतेच्या दृष्टीने चांगलीच उतरेल.

हा अत्यंत चांगला साधलेला उपक्रम असून ह्या पद्धतीने जर तो पुढे चालू राहिला तर मराठीच्या अभ्यासकांना व त्याचप्रमाणे उत्तम साहित्य वाचण्याची इच्छा करणायन रसिक वाचकांचीहि मोठी सोय उपलब्ध करून दिल्यासारखे होईल.

—प्रा. वि. द. संत

[मराठी कथा : १९६३ संयोजक-अरविंद गोखले. कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे २. मूल्य रु. ३-५० ]






अनुक्रमणिका



# माझा पण जुना पत्र संग्रह

-माधव अत्रे

**जुनी पत्रे असं कां म्हटलं जातं ते मला कळत नाही. खरं म्हणजे पत्रं नेहमी 'ताजी' टवटवीत असतात. वाचणारालाही तशीच बनवतात— जुन्या कागदावरची ती 'बोलकी' अक्षरे तुम्हालाही टवटवीत करतील....'**

**पंडीत** नेहरू मोठे आहेत. मी छोटा आहे. त्यांनी जीवनात अनेक क्षेत्रातून कामे केली आहेत. मी फारच थोडया क्षेत्रातून काम केले आहे. त्यांना थोरामोठयांची पत्रे आली. मला आलेली पत्रे तशी नाहीत. त्यांना आलेली पत्रे असामान्य आहेत. माझ्या संग्रहातील पत्रे असामान्य असल्याचा दावा मी मांडू शकत नाही. त्यांनी संग्रह करणं उचित. मन्या म्हणाला, "कशाला उगीच स्वतःच्या पत्रसंग्रहाला 'बंच ऑफ ओल्ड लेटर्स' म्हणून गौरव-तोस ?" आता त्याला दुसरं तरी काय म्हणणार ? कदाचित 'नेहरू-नंतर कोण ?' याची सगळीकडे एकच चर्चा चालली असताना मी माझा पत्रसंग्रह उघडून बसलो असतो तर लोकांचा गैरसमज होण्याची शक्यता होती. पण तसे नाही. लोक नेहरूंचा मोठेपणा ओळखतात. आणि माझा छोटेपणाहि ओळखतात. त्यामुळे मी त्यांची बरोबरी करण्याचा प्रयत्न करतो किंवा तुमच्या वाङ्मयीन भाषेत बोलायचे झाल्यास त्यांच्या पंक्तीत जाऊन बसायची खटपट करतो असा कोणीहि आरोप करू शकणार नाही.

काय असेल ते असो आपल्याकडे आलेली प्रत्येक वस्तू जपून ठेवण्याची लहानपणापासून छंद असल्याने वाचायला आणलेल्या पुस्तकांपासून तीन दिडक्यांच्या कार्डापर्यंत अनेक गोष्टी माझ्या संग्रहात आहेत. संग्रहातली पत्रे मी कधी कधी वाचतो. आज सगळीच पत्रे वाचायची सक्ति करण्यात आली आहे. सामानाची बांधाबांध चालू आहे. आम्हाला आज जागा बदलायची आहे. घरातले सर्वजण त्या गडबडीत आहेत. सगळ्यांनी बजावून सांगितले की, नव्या घरात फालतू गोष्टींची अडगळ घेऊन येऊ नकोस. फक्त महत्त्वाची पत्रे घे. इतर सगळीजण सामानाची बांधाबांध करीत असले तरी त्यांनी कृपा म्हणून मला वेळ दिला आहे. तारेला लावलेली, लाकडी पेटीत ठेवलेली अनेक पत्रे, लिफाफे, सुटे कागद पुढयात मांडून मी बसलो आहे. खूप वर्षापासून ते मी सांठवले आहेत.

त्यात चंदूने लहानपणी मुंबई बघायला गेल्यावर कार्बन पेन्सिलीने मोठमोठया अक्षरात "आमही टरराम गाडीत बसलो. चउपाटीवर किलले बानधले" यासारख्या शब्दात लिहिलेले एक पत्र आहे. आता मुंबईकर झालेल्या चंदूचे सहा वर्षापूर्वीचेही पत्र त्यातच आहे. ते पहा—

"मुंबईत दोन टोके दिसतात. सातमजली हवेलीचे दर्शन घेताना तिलाच चिकटून उभ्या राहिलेल्या झोपडीचे दर्शन टाळता येत नाही. येथे भारी मोटारी आहेत. आणि बोरीवली, कल्याणहून गाडीला लोंबकळत येणारे शेकडो हजारो लोकहि आहेत. वैभव आहे आणि दारिद्र्य आहे. वस्त्र नाही म्हणून उघडे राहणारे व जागा नाही म्हणून फूटपाथवर, पुलाखाली असे राहणारे लोक पाहिले की वाटतं आपण काहीतरी क्रांति केली पाहिजे. परवाच्या सभेत मी हेच सांगितले. क्रांति करण्यासाठी मी सर्वसुखाचा त्याग करणार आहे. आजन्म ब्रह्मचारी राहून दलितांची सेवा करणार आहे."

आतां परवाच आलेले चंदूचे पत्र पहा—

"निशा आता रांगायला लागली आहे. तिच्या बोबडया बोलात आणि रांगण्यापडण्यात स्वर्गसुख सांठलं आहे. परवाचं सुख समाजसेवेत होते. कालचं सुख आशाच्या प्रेमपाशांत होतं. आजचं सुख आशाच्या कडेवरून मला "टाऽऽटाऽ" करणाऱ्या











अनुक्रमणिका

निशाच्या शब्दात आहे. यंदा सिनीअर असिस्टंटच्या परिक्षेसाठी बसणार आहे. पैसा आणि बायकामुलांच्या मायेशिवाय काही खरं नाही वरं कां."

चंदूच्या ह्या मानसिक विकासाचे टप्पे जसे मी पत्र संग्रहामुळे सांगू शकतो तशाच इतरही अनेक गोष्टी मी सांगू शकेन. आलेल्या पाहुण्यांनी धाडलेल्या नुसत्या 'पोंहचल्याच्या' पत्रांवरून गेल्या पंधरा वर्षात येऊन गेलेल्या सगळ्या जरी नाही तरी बऱ्याच पाहुण्यांची संख्या व येण्याजाण्याच्या तारखा सांगता येतील. ताईच्या मंगळागौरीचे पाव्हणे-रावळे, छवीची जन्मतारीख, तिच्या बारशाचा 'मेन्यु', 'येणार' असें कळवून न आलेले रघूमामा, 'मुंबईहून मेकॅनो नक्की आणतो' असे आगमन प्रसंगीच्या पत्रातून व न आणल्यावद्दल दिलगिरीही 'पोचल्याच्या पत्रातून' कळविणारे छोटू काका, राजाचा अभ्यास जोरात चालू असेल. प्रकृतीला जप म्हणावं. इतक्या आस्थेवाईकपणे माझ्यावद्दल चार ओळी लिहिणारांवरोवरच नुसतं 'लहानांस आशिर्वाद' ह्या शब्दांतून आमची दखल घेणारी वडील माणसंहि मला ह्या पत्रातून दिसतात. बदलत्या काळातल्या वदललेल्या पद्धती कळतात. "लेकी-सुना-इष्टमैत्रिणी"-सह येऊन लग्नकार्यास शोभा आणावी असा आग्रह करणाऱ्या लग्नपत्रिकांवरोवरच 'मिस्टर अँण्ड मिसेस रेगे आर हॅपी टू इन्व्हाइट' असं म्हणत चिरंजीवांच्या लग्नाची निव्वळ 'अनाउन्समेंट' देऊन फक्त रिसेप्शनसाठी येण्याचा आग्रह करतानाहि येताना निमंत्रणपत्रिका आणावी असं बजावणारी लग्नपत्रिकाही त्यात आहेत. एरव्ही पानेच्यापाने खरडणाऱ्या मन्यावापूंना "घरी पत्र कसे लिहावे" हे कळत नाही. तर एरव्ही काहीहि न लिहिणाऱ्या दादांना मात्र जिव्हाळ्यापोटी पानेच्यापाने लिहिता येतात.

आयुष्यात आलेले पहिले पत्र हे बहुधा "आणवलेले"च असते. मोठ्या माणसांशी प्रत्येक बावतीत बरोबरी करायला धडपडणाऱ्या बालमनावर येणाऱ्या पत्रांची भुरळ न पडली तरच नवल. पण ही इच्छा कोण पुरवणार? मला खाऊ आणणारे नातेवाईक होते. माझं नांव माहीत असूनहि वेळोवेळी 'बाळ तुझं नांव काय?' असं विचारीत गालावर चापट्या मारणारी मंडळीही होती. पण मला पत्रं धाडणारं असं कोणीच नव्हतं. बाबांना कामासाठी पत्रे येत. आईला माहेरची पत्रे येत. (आणि नंतर दोन दिवस 'आमच्या माहेरी' या उपपदाशिवाय ती कोणतेहि वाक्य बोलत नसे) ताईला सासरची पत्रे येत. आणि आम्हाला चिडवायला विषय मिळे) दादालाही पत्रे येत. (पण कोणाची याचा तो सुगावा लागू देत नव्हता.) पण आम्हाला कोण धाडणार? एकदा बाबा मुंबईला जायला निघाले तेव्हां माहीमचा हलवा, मिलिऑनर्सचा खेळ, रेडीमेड सूट वगैरेच्या जोडीला 'पत्र धाडा' हा नवा हट्ट मी धरला. बाबांना ही आयडिया एकदम पसंत पडली. त्यांनी आश्वासन दिले. इतकेच नाही तर मी उत्तर धाडावे म्हणून कार्डाला पैसेदेखील दिले. ते टांग्यात बसल्यापासूनच मला पहिल्या पत्राचे वेध लागले. दोन तीन दिवस गेले. पण बाबांचे पत्र आले नाही.










एक दिवस पोस्टमनने हाती पत्र दिले. ते होते आईच्या नांवावर. मी अधिकच कावलो. पण पाकीट फोडल्यावर धांवतच येऊन ताईने मला पत्र दाखवलं. त्या पत्रातच माझ्या नांवाने चार ओळी होत्या. त्यात महत्त्वाचा आशय नव्हता. पण जे काही होते ते खास "माझ्यासाठींच". घरात असताना मला जो डोस मिळायचा तोच पत्रातूनहि त्यांनी पाजला होता. पण त्यावेळी त्यांचे शब्द सुवर्णाक्षरांत लिहिले असल्याचा भास होत होता.

चि. वंडूस अनेक आशिर्वाद,

कबूल केल्याप्रमाणे खास तुलाच म्हणून पत्र धाडीत आहे. तू अभ्यास नीट करीत जा. (यावेळी मी बालवर्गांत होतो. बाबांना केवढी काळजी होती पहा.) ताईला त्रास देत जाऊ नकोस. आईचे ऐकत जा. रोज परवचा म्हणत जा. मी मुंबईहून तुझ्यासाठी गंमत आणणार आहे.

बस्स! एवढेच! त्यातली ओळन्‌ओळ त्यावेळी रोज ऐकायला मिळत होती. आता लेखी उपदेश मिळाला होता इतकेच. पण त्या पत्रातून मी माझा भाग कापून घेतला. (आणि मग आईच्या शिव्या खाल्ल्या.) त्या पत्राला उत्तर देण्यासाठी मी तळमळलो. आई म्हणाली, 'सबंध कार्ड कशाला हवे ? मी लिहीन त्या कार्डावर थोडी जागा ठेवते. लिही दोन चार ओळी.' "बाबांनी गांवाला जाताना दिलेले पैसे "लहान मुलांच्या हातात पैसे राहू देऊ नयेत. वाईट संवयी लागतात अशाने" या ग्राउंडवर काढून घेण्यांत आले होते. त्यामुळे माझा नाईलाज झाला. आईने पत्र लिहिले तेव्हा माझ्या उत्तराचे तिच्या लक्षात राहिले नाही. मी आरडाओरडा केला. आईने स्वतंत्र कार्डासाठी पैसे 'सँक्शन' केले. ते प्रत्यक्ष हातात येईपर्यंत बाबा मुंबईहून परत आले व अशा रितीने आयुष्यातल्या पहिल्या पत्राला मी उत्तर देऊ शकलो नाही.

हा अनुभव लक्षांत घेऊन ताईला सासरी जाताना मी पत्राबद्दल बजावले. मला आता उत्तर लिहिण्याची ओढ लागली होती. कोणत्याहि परिस्थितीत आलेल्या पत्राला उत्तर धाडायचेच असा मी निश्चय केला. अर्थात त्यासाठी पत्र येण्याचीच फक्त गरज होती. पण ताईने मला लिहिलेले पत्रही तसेच होत. अभ्यास करावा, आईचं ऐकावं यासारख्या गोष्टी पत्रात लिहिण्याची गरज असतेच कां ? आता मला वाटतं की लहानपणी मला 'मोठ्या कौतुकाने' पाठविलेल्या पत्रांकडे माझ्या चरित्रकारांनी पाहिले तर मी घरात आईला खूप त्रास देत होतो, अभ्यास व्यवस्थित करीत नव्हतो. परवचा म्हणत नव्हतो. यासारखे गैरसमज होतील. स्वतंत्र कार्डावर तर जाऊच द्या. दुसऱ्याच्या पत्रातून आम्हाला जे छटाकभर पत्र यावयाचे त्यातहि प्रत्येकाने हाच उपदेश केलेला असायचा. पण काही कां असेना. पत्रे येताहेत याच एका गोष्टीचे समाधान मी लुटत होतो. उत्तरे धाडण्याच्या बाबतीतली माझी 'आर्थिक गळचेपी' (शब्द मोठेपणी सुचलेला) लक्षात घेऊन मी ताईला नॉटपेड पत्र लिहिले. आईला धाडलेल्या पत्रात 'बंडूकडे लक्ष ठेवत जा. त्याला काहीएक कळत नाही' या शब्दात माझ्या उत्तराचा तिने सन्मान केला.

आता ती स्टेज संपलेली आहे. पत्रे अनाहूतपणे येतात. आणि उत्तरे धाडण्याच्या आळसामुळे शिव्या देण्यासाठी पुन्हा ती येतंच राहतात. 'अभ्यास' नीट करीत जा' असं डोळे वटारून सांगणारे पत्रातले शब्द आता म्हातारे झाले आहेत. उलट अभ्यासाचा ढालीसारखा उपयोग करून मीच पत्र लिहिण्याचा आळस लपवीत असतो. मी आता मोठा झालो आहे. विविध क्षेत्रातल्या विविध व्यक्तींशी, संस्थांशी थोड्याफार प्रमाणात संबंध येतो. 'लहानांस आशिर्वाद' सारख्या शब्दात आमची विचारपूस करणारी वडीलधारी मंडळीहि आता 'विचारायला' लागली आहेत. कारणाकारणांनी आलेला पत्रांचा हा ढीग माझ्यापुढे येऊन पडला आहे.

बंड्या,

तुझी फार आठवण येते. आपण जमविलेली पाकीटे, बनविलेले टक्शल, पाडलेल्या चिंचा, आणि बुडविलेले तास डोळ्यापुढे येतात. लालटाकीच्या आणि किल्ल्याच्या बाजूला वेगात फिरविलेल्या सायकली, सोसायटी हायस्कूलच्या भिंतीवर खडूने स्टंप्स काढून तासन्‌तास खेळला जाणारा क्रिकेट आणि सीतेला पाणी नाही म्हणून लांब विहीरीवर जाऊन पोहणं यासारख्या गोष्टी आठवल्या की, वाटतं पुन्हा एकदा त्या रम्य जगात जावं. अभ्यास कसा काय चालला आहे ? एकदा माझ्याकडे ये. येच.

हे शरदचे पत्र खूप दिवसांनी सांपडते आहे. त्याच्या वडिलांची बदली झाल्यावर त्याने नगर सोडले. त्यानंतर आमची भेटच नाही. काही वर्षे अशी पत्रे येत. आता ती बंद झाली. आणि खरं सांगायचं म्हणजे मला आता तसल्या थाटाच्या पत्रांचे फारसे आकर्षण वाटेनासे झाले आहे. 'दिवसाच्या वेलीवरची स्मृतीची पुष्पे' किंवा "सुहृदाच्या दर्शनाची चंद्रकिरणे इतक्या योजनांवरून येतात असं तुझ्या पत्रातल्या ओळी वाचताना वाटतं. माझ्या जीवनाच्या सरोवरातील सुखपत्रे फुलू लागतात." यासारख्या ओळी लिहिणारांची पत्रे वाचतांना आता मला हंसू येते. तसं लिहिणारे बदललेले नसतात. बदल झाला आहे तो माझ्यात. तरीहि मी ती पत्रे जपून ठेवली आहेत.

खऱ्याखुऱ्या अर्थाने मी पत्रांच्या जगात शिरल्यावर जमलेली पत्रे मी पुन्हापुन्हा पाहतो. शालान्त परिक्षेच्या वेळी अनेकांनी शुभेच्छा कळविल्या. 'व्यक्तिमत्व' नांवाची चीज आपल्यापाशीहि असल्याचे तेव्हा मला प्रथम कळले. पत्रातला सारा मजकूर माझ्यासाठीच होता. पत्त्यावर माझे नांव होते. मी पास झाल्यावर तुरळक पत्रे आली. पण विशेष निरोप समारंभाच्या वेळी आम्ही बाहेरच्या जगात पडणार असल्याचे मुख्याध्यापकांनी जे सांगितले होते ते 'पडणे' वेगळ्या अर्थाने सुरू झाले. या जगातली पहिली बहुतेक पत्रे नकारात्मक होती. काही ठिकाणी शिक्षण अपुरे वाटत होते. काही ठिकाणी उंची कमी पडत होती. आणि वशिल्याची तर प्रत्येक ठिकाणीच कमतरता होती. काही पत्रे मुद्दाम स्वखर्चाने मागविली होती. कोणत्याहि "न पाहिलेल्या माणसाचा"





अनुक्रमणिका







दासानुदास होण्याची माझी तयारी होती. पण कोणी बोलावितच नव्हतं. अनेक वर्षे आमच्या घरी येणाऱ्या पोस्टमनला माझं संपूर्ण नांव माहीत नव्हतं. ते याच काळात माहीत झालं. माझा कॉरस्पॉण्डन्स भलताच वाढला होता.

नोकऱ्यांसंबंधी माहिती पुरविणाऱ्या एका पुस्तकाच्या आधारे धाडलेल्या एका पत्राचे उत्तर मजेदार होते. पत्र लेखकाने (म्हणजे त्याच्या कारकूनाने) म्हटले होते—

'आपल्या पत्रात निर्देशिलेल्या जागांसंबंधी आम्हाला काहीएक माहिती नाही. तुम्ही उल्लेखिलेल्या पुस्तकातील आमच्याबद्दलची माहिती चुकीची आहे. पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर आम्ही वृत्तपत्रातून केलेला खुलासा वाचला असता तर पत्र लिहिण्याचा त्रास पडला नसता.'

औद्योगिक शिक्षण देणाऱ्या एका संस्थेकडून मी माहितीपत्रक मागविले व संस्थेत येण्याची इच्छा प्रदर्शित केली. तिकडून उत्तर आले–

"सध्या संस्थेत जागा नाहीत. नजिकच्या काळात होतीलसे वाटत नाही."



निरनिराळ्या कचेऱ्यातून येणारी उत्तरे ठरीव सांच्याची असत. त्यात माझ्या पत्राचा त्यांच्या दप्तरी पडलेला रेफरन्स नंबर (तो वाचताना अर्धा उत्साह खलास होई) देऊन 'जागा नसल्याचे' 'खेदपूर्वक' सांगितलेले असायचे. आपल्यासाठी काही करता येत नसल्याने त्या भल्या माणसांना वाईट वाटतंय हे पाहताना मला गहिंवरून येत असे. पुढे एका फर्ममध्ये चिटकल्यावरचा तिथला प्रेमळ पत्रव्यवहार मी एका स्वतंत्र फायलीत जपून ठेवला आहे. ती सगळीच पत्रे जपून ठेवावी लागणार. काय निवडावं हा प्रश्न मनाला शिवणार नाही की, रेफरन्स नंबरचा राग येणार नाही. त्या पत्रातून कानपिचक्या आहेत. हलगर्जीपणाबद्दल दिलेला दम आहे. निरनिराळे हुकूम आहेत. राग आला तरी त्या पत्रांचा मी चोळामोळा केला नाही. सगळी पत्रे जपून ठेवली आहेत.

या पत्रांच्या पाठोपाठ आलेली काही पत्रे मी चाळतो.

चि. वंडूस आशिर्वाद,

'तूं हापीसात कायम झाल्याचे कळताच सांडव्यावरच्या देवीला मागे मी म्हटलं होतं ना म्हणून आपली खणानारळाची ओटी भरली. कामाकडे लक्ष देत जा. तुझा वेंधळेपणा तिथे दाखवत जाऊ नकोस. तूं एकदा बोलत तर बोलतच राहतोस. लोक काही तोंडावर नांवे नाही टेवणार. पण मागून नांवे ठेवतील. पुण्यामुंबईसारख्या ठिकाणी माणसानं कसं चंट (हा आईचा खास शब्द) बनायला हवं. प्रकृतिला जपत जा. आणि म्हटलं पत्र धाडत जा. म्हणजे तेवढीच काळजी दूर होते.'

हे आईचे पत्र. धाकटया वहिणीने पत्राखालील कोऱ्या जागेत लिहिलेल्या चार ओळी–

तीर्थस्वरूप वंडुदादास सा. न. (आईवडिलांना तीर्थरूप व इतरांना तीर्थस्वरूप म्हणायचं हे नुकतेच शाळेत शिकविलेले दिसत होते.)

तूं गेला म्हणून करमत नाही. मला दसऱ्याला पाटीवर सरस्वती कोण काढून देणार? तू दिवाळीला येशील तेव्हा नवा फ्रॉक आणि खूप खूप गंमत आण. नीलाचा दादा तिला फ्रॉक आणणार आहे. मी तिला म्हटलं की, तुझी मिजास नको. वंडूदादापण फ्रॉक आणणार आहे.

उषाचे हे पत्र मी जपून ठेवले आहे. बाबांचे पत्र उपदेशात्मक आहे.

'तसा तू चांगला मुलगा आहेस. पण या वयांत वेळीच लक्ष द्यावे लागते. पुण्यासारख्या शहरात आहेस. हातात पैसा खेळतोय. तेव्हा वेळीच सावध केलेले बरे. जमाखर्च लिहीत जा. ऑफिसांत वेळेपूर्वी जात जा. जास्तीत जास्त कामाची तयारी दाखवावी. लवकर जावं लागलं उशीरापर्यंत बसावं लागलं तरी कुरकुर करूं नये. साहेबांची मर्जी संपादण्याचा प्रयत्न करावा. आपले लोक तेवढयास तेवढे असतात–नमून वागत नाहीत म्हणून ते वर येत नाहीत. पैशाची काळजी करू नकोस. काटकसर करू नकोस. आणि दरमहा जास्तीत जास्त पैसे शिल्लक टाकीत जा. अजून तुझं सगळं आयुष्य जायचंय.'

या घरगुती पत्रांच्या पाठोपाठ मारा सुरू झाला तो वधुपित्यांचा व आमच्याहि नातलगांचा. आईने लिहिले––

'आता तूं कायम झाला आहेसच. लवकरच सूनमुख पाहीन म्हणते. आपटीणबाईची भाची–फक्त फायनलपर्यंत शिकली असली तरी –नाकीडोळीं नीटस आहे. आणि मुख्य म्हणजे घर कामांत हुषार आहे. शिवणकाम येतं. हिंदीच्या परिक्षा झाल्या आहेतच. (मुलींना दोरीवरच्या उडया येतात हे ऐकताना जसं आश्चर्य वाटत नाही तसेच हिंदीच्या परिक्षा झाल्याचं ऐकल्यावरहि मला आश्चर्य वाटत नाही. सगळ्याच मुली कां कोणास ठाऊक त्या परिक्षा देतातच) तूं संमति कळव. तुला ती चांगली शोभून दिसेल.'

पत्र पाठविल्यावर आई हा जोडा मनातल्या मनात जुळवेपर्यंत दुसरी एकादी 'नक्षत्रासारखी' मुलगी सांगून येई आणि आईसाहेबांना आमचा जोडा 'लक्ष्मी नारायणासारखा' दिसे.

ह्या पत्रांचा मारा अपेक्षितच होता. पण मला पुढे शिकायचे होते. त्यामुळे मी तिकडे दुर्लक्ष केले. तरीहि येणारी काही पत्रे



अनुक्रमणिका

अगदी आग्रही स्वरूपाची होती. मी शिक्षणाचे कारण सांगितल्या-वर बापूकाकांचे आलेले पत्र त्यापैकीच होते—

'तूं इतका हट्टी असशील असे वाटले नव्हते. वर्व्यांच्या मुलीत वाईट असे काय आहे? शिवाय हुंडाहि भरपूर मिळेल. शिकून तूं काय मिळवणार? बी. ए. एम. ए. ला आजकालच्या दिवसात विचारतोय कोण? तूं चटकन हो म्हण. निदान मुलगी बघण्यास तयार हो.'

एका वधुपित्याने तर शिकला नाही तर काय संसार होणार नाही कां? असा पत्रातून सवाल टाकला व बिनशिकलेल्या पण सुखाने संसार करणाऱ्या अनेकांचे दाखले दिले.

ह्या पत्रांना बाजूला सारतानाच त्यांना रुबाबांत खेटून बसलेली एक चिठ्ठी दिसते आहे. ती आली तेव्हां मी चटकन तिचा चोळामोळा केला. पण पुन्हां व्यवस्थित जपून ठेवली.

"रेखा ही काही सामान्य मुलगी नाही कीं, कोणत्याही उडाणटप्पू तरुणाने तिचा अनुनय करावा. आपल्या वाह्यातपणाला ती रिस्पॉन्स देते हा तुमचा भ्रम दूर करण्यासाठी मी मुद्दाम पत्र लिहीत आहे. (विचारा मी! माझं मन रेखाला कधी कळलंच नाहीं) पुन्हां तिच्याशी बोलतांना दिसलांत तर तंगडी मोडून टाकीन."

हा आम्हाला रेखाच्या तीर्थरूपांचा अहेर. प्रेम आंधळे असते असे म्हणतात. पण त्याच्यापायीं आमच्यावर लंगडे होण्याचा प्रसंग येत होता. रेखासाठीं सर्व सुखाचा—अगदीं जीविताचा सुद्धां त्याग करायची माझी तयारी होती. पण म्हणून काय तंगडी गमवायची? जिच्यासाठीं जीविताचा त्याग करायची तयारी होती तिच्यासाठी तंगडीसारखी क्षुल्लक गोष्ट गमावणे मला अपमानास्पद वाटले व मी रेखाचा नाद सोडला. आयुष्यांतली पहिली सिगारेट मी केव्हां ओढली हे रेखाच्या वडिलांच्या पत्रावरून सहज सांगता येईल. मला कविता करायचा छंद लागला तो त्याच दिवसापासून. माझ्या हृदयाचे हजार (नक्की किती ते मोजले नाहीत. पण साधारणतः हजार तुकडे होतात असे म्हटले जाते) तुकडे झाले. प्रत्येक तुकड्यांतून मी एकेक हृदयस्पर्शी पीस लिहूं लागलो. माझ्या पत्रसंग्रहात आतां संपादकांच्या व चाहत्यांच्या पत्रांची भर पडली. काव्याशी माझे फारसे जमले नाही. व गद्यलेखन अगदीच 'गद्य' म्हणून परत येऊं लागले.

एका संपादकाने लिहिले होते—

"आमच्या मासिकात दर्जेदार कथा प्रसिद्ध होतात. आम्हांला कोणत्या प्रकारच्या कथा लागतात हे आमचे अंक वाचून तुमच्या लक्षांत येईल. ही कथा परत पाठवीत असल्याने निराश होऊं नका. आमचे अंक वाचीत जा. म्हणजे चांगल्या कथा लिहितां येतील. आमची वार्षिक वर्गणी रु. १२ असून नमुना अंक एक रुपयास मिळेल. तुम्हीं वर्गणीदार व्हा. आपण देऊं केलेल्या साह्याबद्दल आभारी आहोत."

साधारणतः पोस्टेज धाडले व कथा नापसंत असली तर ती परत येते. पण काही संपादकांनी आपल्या कचेरीतून माझ्या नापसंत साहित्याची अडगळ दूर करण्यासाठी पदरचे पैसे खर्च केले. व काहींनी पुरेसे 'हंशील' पाठवूनहि मोठ्या प्रेमाने माझे साहित्य (बाजूला) ठेऊन दिले.

कोणत्याहि चांगल्या गोष्टीची सुरुवातीला होणारी टिंगल माझ्याहि वांट्याला आली. महत्त्वाची पत्रें येतील या आशेने दाराशीं उभे राहणाऱ्या उषाला किंवा दादाला पोस्टमन माझ्या 'साभार परती'च्या कथा देऊं लागला तेव्हां ते माझी खूप टिंगल करूं लागले. माझ्या छापील कथांचा मोबदला येऊं लागल्यावर मात्र माझ्या गुणाचे कौतुक होऊं लागले. एका पत्रांत मी घराण्याचे नांव उज्ज्वल करणार असल्याचे म्हटले होते.

"मी अजून तुझी एकहि ओळ वाचलेली नाही. पण तू आजकाल गोष्टीविष्टी लिहितोस असं ऐकलं. तुझी लेखणी समर्थ आहे. तुझ्या भाषेंत लालित्य आहे. प्रसाद आहे तूं मोठा लेखक होशील असें वाटतें. तुझें कुठें कुठें काय काय छापून आले ते कळव." असे लिहिले होते.

पहिली कथा छापून आल्यावर मी सात आठ कार्डें विकत घेऊन ते साऱ्यांना कळविले व अभिप्रायाची वाट पहात बसलो. चार महिन्यांत सगळ्यांची उत्तरें आलीं. पण बहुतेक पत्रांत माझ्या पत्राचा वा त्या कथेचा अजिबात उल्लेख नव्हता. एकानें मात्र 'तूं फार चांगला मुलगा आहेस. पण कथाविथा लिहीत जाऊं नकोस बुवा.' हे 'तुम्हीं आमच्या पाठच्या भावासारखे. पण दारू सोडा बुवा'च्या थाटांत सांगितले होते. छोटु काका (बाबांचे एक स्नेही) मोठे रसिक. त्यांनीं कथा वाचली व लगेच लिहिले—

तुझ्या व्यक्तित्वाची खरी ओळख परवां पटली. तू शाळेत निबंध लिहीत होतास. कुठें हस्तलिखितांतून थोडी फार धडपड करीत होतास. तेव्हांपासून माझे तुझ्याकडें लक्ष आहे. पण परवां 'उर्वशी'मधील 'दारावरची थाप' वाचली तेव्हां तुझ्या कलासक्त रसिक मनाची ओळख पटली. विसू लहानपणी लिहीत असे. (विसू म्हणजे माझे वडील) पुढें ते त्याने बंद केले. पण तुझ्या कथेंतला शृंगार तुझ्या बापाला कांहीं जमला नाही.

छोटूकाका हे बाबांचे बालमित्र. त्यामुळे नेहमीं असलेच प्रेमळ शब्द वापरायचे. मी बाबांना तें पत्र दाखविले, तेव्हां ते खो खो हंसायला लागले. कथा शृंगारिक असल्याने मी त्यांना दाखविली नव्हती. पत्र वाचल्यावर त्यांनी ती मागून घेतली व वाचल्यावर मला शिंग फुटल्याचा अभिप्राय दिला. "ह्या सीझन-मध्ये बार उडवून टाकला पाहिजे" अशी घोषणा केली. माझ्या कथेंतील भावविश्वाचा आणि शैलीचा लौकिक जीवनावर असला काही परिणाम होईल असें स्वप्नांतहि वाटलें नव्हते. मी माझी सुटका करून घेण्याचा प्रयत्न करीत होतो. पण बाबा कसले ऐकताहेत!

अजून खूपशीं पत्रे बघायचीं आहेत. सगळीजण नव्या घरा-कडे जाण्यास निघाले आहेत. मला दिलेला वेळ संपला आहे. आणि "सगळींच पत्रें निरुपयोगी आहेत. त्यांत निवड कसली करायची!" असं प्रत्येकजण म्हणतोय. माझा तर विचार असा आहे कीं, सगळीच्या सगळी पत्रे घेऊन नव्या घरांत जावं आणि पुन्हां हा पत्रसंग्रह उघडून बसावं.

● ● ●

पी. एल. ४२०



सांपडला हो, पी. एल्. ४२० मध्यें भारताचा पण दाणा आहे, बरं कां!





# कासवाची पाठ



**शुभदा** दार उघडते. आत येऊन टेबलावर पर्स ठेवते आणि पंखा चालू करते.

"आत या नं !" वसुधा बाहेर अवघडून उभी असते. शुभदा मागे वळून बघते. गोडसं हंसते.

"हे आमचं घर !" उन्हाने कोमेजलेल्या तिच्या चेहेऱ्यावर समाधानाची छटा तरळते.

वसुधा आत येते. संकोचत सोफ्यावर बसते.

महिन्यापूर्वीच ती नोकरीवर रुजू होते. तिच्या शेजारच्याच टेबलावर बसणारी ही शुभदा देशपांडे. सौ. शुभदा देशपांडे. तिच्याहून जराशी प्रौढ. स्थूल बांध्याची. हंसरी, सुस्वभावी, मनमिळावू, कामात कुशल. आज आठ वर्षे नोकरी झालीय तिची. वसुधाचा नोकरीचा पहिलाच अनुभव.

पहिल्या दिवशी वसुधा ऑफिसमध्ये येते. शिपायाच्या मागोमाग येऊन रिकाम्या टेबलवर बसते. सगळयांच्या नजरा आपल्याकडेच लागल्याची तिला जाणीव होते. ती पाणी मागते. एक ग्लास पाणी घटाघटा प्यायल्यावर खुर्चीत स्थिरावते. पायातल्या चपला काढून बोटांची चाळवाचाळव करते. हाताने पदर सारखा करते. आणि समोरची फाइल उघडते. एकदम असंख्य निरर्थक शब्द तिच्या डोळ्यांवर हल्ला करतात. ती कावरीबावरी होते. शब्दांमध्ये बुडून जाते. शॉर्टफॉर्मस्चा अर्थ लावण्याचा अयशस्वी प्रयत्न करते. भोंवतालच्या दहापांच टेबलवरील अपरिचित नजरांनी कासावीस होते. ताण असह्य होऊन खिडकीबाहेर बघत रहाते.

**सौ. छाया दातार**

"एस्क्यूज् मी. नांव काय तुमचे ?" एक गोड बायकी आवाज. ती दचकून मान वळविते.

"माझे नांव शुभदा देशपांडे." प्रथमच

**ऑफिसच्या पहिल्याच दिवशी कां कुणास ठाऊक पण वसुधा देशपांडेला शुभदा देशपांडे भेटली. तिने जवळीक दाखविली. नको होती तरी आणि नको इतकी........**

नोकरी करताहां कां ? मी हे शॉर्टफॉर्मस् समजावून देऊ ?"

वसुधाला एकदम हलकं वाटतं. शुभदा देशपांडे तिची खुर्ची वसुधाच्या टेबलाजवळ आणते. आणि हलकेच तिला समजावून सांगू लागते. वसुधाचे एकदम तिच्यावर प्रेम जडतं.

"खूप छान ठेवलय् घर तुम्ही." वसुधाला खरंच असं म्हणायचं असतं. सोफाच्या कव्हर्सवर भरलेल्या जपानी बायका फारच नाजुक असतात. आणि खिडकीच्या पडद्यावरील फुलांची महिरप. मधल्या दाराचा क्रोशाने विणलेला जाळीदार पडदा. भिंतीवर लटकाविलेले रामसीतेचे सुबक मातीचे चित्र. ग्लॅक्सो बेबीचे कॅलेंडर. घर फार स्वच्छ वाटतंय्. नोकरी करून इतके जमणे कठीणच.

शुभदेची ओळख झाल्यापासून वसुधेला तिच्याविषयी ओढ वाटायला लागली आहे. कदाचित् काही दिवसात ती तिचा थंडपणा टाकून तिच्या जवळहि जाईल. तिला बरं वाटतं, कुणीतरी जिवाभावाची मैत्रिण तिला मिळणार आहे. पुरुषाची तिला भीति वाटते. कोणी तिच्यावर अधिकार गाजवलेला तिला आवडत नाही.

"असं औपचारिक बोलू नका हं ! पहिल्याच दिवशी तुम्ही आलात नं ऑफीसात तेव्हांच तुमचे माझ्यावर इतके इम्प्रेशन पडलं. आणि कां कुणास ठाऊक, मला वाटलं तुमची माझी फारा दिवसांची मैत्री आहे." शुभदेच्या बोलण्यात सहजपणे वसुधेच्या बद्दल आदराची छटा चमकून जाते. ती ऐसपैस बसते. रुमालाने घाम टिपू लागते.

वसुधाहि मांडीवरची पर्स खाली ठेवते. शुभदेच्या बोलण्याने सुखावते. काही वर्षांपूर्वी अविनाशहि असंच म्हणाला होता.

"तुला पहिल्यांदा पाहिलं. आणि तुझे इतके इम्प्रेशन पडलं की ठरवून टाकलं, या पोरीला आपण जिंकलंच पाहिजे."

तिला माहित होतं, तिच्या उंच डौलदार मानेमुळे आणि लांबसडक शेपटयामुळे ती चटकन् लोकांच्या नज़रेत भरायची. त्यावेळी तर तिच्याभोंवती मुग्ध निरागसतेचे आवरण लपेटलेले होते.

"पण तुमची मला पहिल्या दिवशी फार मदत झाली हं ! मी तर इतकी गोंधळून गेले होते. त्या शब्दांच्या पसाऱ्याने नर्व्हस झाले होते. आणि तुम्ही अगदी परमेश्वरासारख्या मदतीला धावून आलात." तिला म्हणायचं होतं, 'तुम्ही मला फार आवडता.' पण कोणाच्या इतक्या जवळ जाणं तिला जमतच नाही. अविनाशही म्हणायचा, "किती फ्रीजिड आहेस तूं. बर्फासारखी थंडगार. कोणी तुझ्याजवळ येऊ लागलं की तूं कासवासारखं सगळं अंग संकोचून घेतेस. तुझ्या वृत्ति बोथट होतात. वरती रहाते फक्त टणक निबरट पाठ. एखाद्याचे डोके आपटून आपटून रक्तबंबाळ व्हायचे."

अविनाशच्या आठवणीने वसुधा शहारते. या घरात आल्यापासून सारखी अविनाशची आठवण येतेय्.

तिच्या इतके जवळ येण्याचा प्रयत्न आजपर्यंत कोणी केला नव्हता. की तिनेच कोणाला आपल्याजवळ येऊ दिले नव्हते ? पहिला अविनाश आणि आता ही शुभदा. ती दचकते. अविनाशने जवळ येण्याचा प्रयत्न केला त्याला कारण होतं. त्याचे तिच्यावर प्रेम होते. त्याला तिच्या प्रेमाची अपेक्षा होती. पण शुभदाला ? हा सारा बोथटपणा सहन करून शुभदा कां उगाच रक्तबंबाळ होतीय् ? तिला काय हवंय् ? निरपेक्षपणे दुसऱ्यावर प्रेम करता येते !

वसुधा हंसण्याचा प्रयत्न करते. तिला शुभदाशी इतक्या परकेपणाने वागायला आवडत नाही. ती शुभदाशी मैत्री वाढवायला उत्सुक आहे.

"असंच गोंधळायला होतं हो. मीहि आठ वर्षांपूर्वी पहिल्यांदा ऑफिसमध्यें गेले नं, तेव्हा अशीच घाबरले होते. पण संवयीने रुळले. आता तर नोकरी करणे हा मला माझ्या जीवनाचा आवश्यक भाग वाटतो. हे तर नेहमी म्हणतात, तूं नोकरी सोडून दे.' पण मलाच भीति वाटते, घरी करमणार नाही म्हणून."

अविनाशलाहि बायकोने नोकरी केलेली आवडत नसे. म्हणून तर ती अजूनपर्यंत नोकरीच्या प्रांतात अनभिज्ञ होती.

"म्हणजे लग्नापूर्वीपासूनच तुम्ही नोकरी करताहां को ?"

"हो. त्याचं असं झालं, मी बी. ए. झाले आणि माझ्या पाठच्या दोन भावांची शिक्षणे व्हायची होती. अर्थात् माझ्याच नोकरीवर सर्व काही अवलंबून नव्हते. पण पटकन् कुठे लग्न जुळले नाही. तेव्हा विचार केला, घरी बसून तरी काय करायचंय्. नोकरी केली तर तेवढाच हातभार होईल बाबांना. तुम्ही कां बरं नोकरी करायला लागलात ?"

"हेच. कंटाळा येतो. करमत नाही म्हणून." वसुधाला भीति वाटली, ती आता तिचा भूतकाळ सांगायला लावेल. तिच्या जीवनांत कोणी डोकावून पहावं ही कल्पना तिला पटत नव्हती. ती ताठरते.

पण खरं सांगू, एकदा तुम्ही नोकरीला लागलात नं की, तुमच्या लग्नाचं मात्र राहून जातं. नाही म्हटलं तरी आईवडिलांचे दुर्लक्ष होतं. चाललंय् चालू द्या. अगदी गळ्याशी येईपर्यंत कोणी लक्ष देत नाही. आणि मग तुम्हालाहि त्या स्वातंत्र्याची चटक लागते. माझंच बघा






ना ! आठ वर्षे मी ती नोकरी करतेय्. दोनच वर्षांपूर्वी माझे लग्न झालं. माझे पति फारच चांगले आहेत, त्यामुळे उशिरा लग्न होऊनहि मला जड गेले नाही. पण माझ्या कितीतरी मैत्रिणींचा अनुभव पाहाते नं मी. पुष्कळजण लग्न झाल्यावर नोकरी सोडलीच पाहिजे अशी अट घालतात. आणि मग इतके दिवस बाहेर राहिलेल्या त्यांना घरची कामे करताना कंटाळा येतो." शुभदा थांबते. तिच्या मनाचा निश्चय होत नाही. मग अभावितपणे विचारते–

"तुम्ही, तुम्ही कां नाही लग्न केलं ?"

"मी ?" वसुधा दचकते. तिच्या एकदम लक्षांत येतं, ती आता पूर्वीची सौ. वसुधा देशपांडे नसून परत कु. वसुधा लोणकर झाली आहे. इतकी जवळीक तिला सहन होत नाही. ती आकसून जाते.

"कारण तसं काहीच नाही. मी आई-वडिलांची एकुलती एक मुलगी. माझ्या वडिलांच्या स्थळाबद्दल फार मोठ्या अपेक्षा होत्या. शिवाय त्यांना पत्रिका पाह्यची होती. त्यामुळे पहिल्यांदा आलेली चांगली, चांगली, सुशिक्षित पण मध्यम वर्गीय स्थळे गेली. आणि मग वडील आजारी पडले. स्थळं पाहाण्याचा खटाटोप त्यांना जमेना. मग राहिलं ते राहिलंच." ती धडधडीत खोटे बोलते. कपाळावरचा घाम पुसत राहते.

"म्हणून मग आता तुम्ही नोकरीला लागला वाटतं ?" शुभदा सहजपणे विचारते. तिच्या शब्दात सहानुभूति व्यक्त होते.

"तसंच काहीसं". तिच्या सहानुभूतीने ती थरारते. पूर्वीच्या स्वप्नांचा काही एक अवशेष आपल्या व्यक्तिमत्वांत राहिलेला नाही या जाणीवेने तिला हायसं वाटतं.

"तुमचं आपल्या पतिराजांवर फारच प्रेम दिसतंय्. प्रेमविवाह झालाय् की काय ?" वसुधा स्वतःला सावरून तिला खुलविण्याचा प्रयत्न करते. संभाषण तिच्या भोवतीच फिरलेले बरं. तरच तिला स्वस्थपणे बसता आले असतं.

"प्रेमविवाह म्हटलं तर म्हणता येईल. माझ्या धाकट्या भावाच्या ऑफिसामध्येच हे नोकरीला होते. एक दोनदा काही कामानिमित्त आमच्या घरीहि आले होते. त्यांच्या खेळकर, मनमिळाऊ स्वभावामुळे आमच्या घरी सर्वांनाच हे फार आवडले. माझ्या भावाने त्यांना विचारून पाहिले. त्यांचे एकदा लग्न झाले होते आणि काही कारणाने त्याना घटस्फोट घ्यावा लागला होता. माझी काही हरकत नव्हती. संसार करण्याची, स्वतःचे घर थाटण्याची माझी फार दिवसांची इच्छा अपूर्ण राहिली होती. दोन दिवस आम्ही फिरायला गेलो. आणि त्यांच्या प्रेमळ, उमद्या स्वभावाने मी भारावून गेले. पुढे थोड्याच दिवसात आमचे रजिस्टर्ड लग्न झाले. आणि खरं सांगते, तेव्हापासून मी खूप सुखात आहे." तिच्या चेहऱ्यावर तृप्तीचा भाव असतो.

घटस्फोटाचा उल्लेख ऐकल्यावर वसुधा दचकते. सावरून बसते. देशपांडे—घटस्फोट घेतलेला देशपांडे—सौ. शुभदा देशपांडे—नवऱ्याचे नांव ! देशपांडे नांव खूप कॉमन आहे. देशपांडे शेकडोनी असतात. तिच्या मनावरचा ताण कमी होतो. ती कुतूहलाने विचारते,

"पण—पण तुम्ही त्यांना घटस्फोटाचे कारण नाही विचारलं ?" इतका वेळ आपल्याच नादात असणाऱ्या शुभदेला प्रश्नाचे गांभीर्य एकदम जाणवतं. तिच्यातील सहजता नाहीशी होते. हंसरा चेहरा स्तब्ध होतो. ती एकटक वसुधेकडे बघत रहाते.

प्रश्न फारच खाजगी झाला या जाणीवेने वसुधा अपराधी होते. आणि एकदम शुभदा हंसते. जणु काही प्रश्न फार साधा होता आणि उगाच त्याला गांभीर्याचं स्वरूप आलं.

"हो, विचारलं नं ! त्या दोघांचे स्वभाव वेगवेगळे होते. त्यामुळे नेहमी भांडणे व्हायची. त्यांना एकत्र राहाणं अशक्य झाले. म्हणून दोघांच्याहि मानसिक स्वास्थ्याच्या दृष्टीने त्यानी दूर व्हायचं ठरविले." शुभदा सहजपणे बोलते.

अविनाशहि हेच म्हणाला होता. शेवटच्या दिवशी. ते एकमेकांपासून दूर झाले त्या दिवशी — तिला खरंच वाटत नव्हतं. पांच वर्षांपूर्वी तिच्या वडिलांकडे तिला मागणी घालायला येणारा अविनाश. लग्नापूर्वीच्या प्रणयाराधनेत, 'माझी वसुधा, माझी वसुधा' म्हणून त्याने तिच्या भोवती केलेला गुंजारव. आणि लग्नानंतर गाजविलेला नवरेपणाचा हक्क. तिने फक्त त्याची वायको एवढ्याच नात्याने जगावं हा आग्रह. तिच्या व्यक्तिमत्वाच्या विकासाच्या आड येणारी त्याची हुकूमशाही — ती कंटाळली. त्याच्या Possessive वृत्तीचा तिला उबग आला. तिला प्रतिसाद देता येईना. त्याच्यावरोबर रहाणे तिला असह्य झाले. तिने घटस्फोटाचा विषय काढला तेव्हा अविनाश हवकून गेला. तिचे आरोप त्याला पुष्कळसे पटत होते. पण स्वतःचा स्वभाव बदलता येईना याची त्याला खात्री देता येईना. तिच्यापासून दूर जायचे या कल्पनेने तो ढांसळून गेला. त्याचे तिच्यावर प्राणापलीकडे प्रेम होते. पण नाईलाज होता. तिची अस्मिता तिला खुणावत होती की ते सारे खोटं होतं ! अविनाशपासून दूर गेल्यावर काही दिवस ती स्वतःला हरवून बसली होती. स्वतःच्या व्यक्तिमत्वाचे हरविलेले भाग जुळविता जुळविता थकून गेली होती. एकलेपणाच्या असह्य ताणाने सुकून गेली होती. अविनाशशिवाय जगण्याचे धैर्य तिच्यात होते कां ? तिच्या आईवडिलांनी लाडक्या लेकीला प्रथम समजावून पाहिले. पण तिचा दृढ निश्चय पाहिल्यावर ते तिच्यामागे उभे राहिले. घटस्फोट घेऊन दोन वर्षे झाली तरी आपण केले ते चूक की बरोबर हे अजून तिला पुरते उमजले नव्हते. विचार करकरून तिची तब्येत खालावली. लक्ष दुसरीकडे गुंतविण्याचा एकच उपाय होता. म्हणूनच तिने नोकरी धरली होती.

तिचा मलूल चेहरा पाहून शुभदा अस्वस्थ होते.

"चला, उगीच आपण गंभीर विषयावर घसरलो. मी आता मस्तपैकी गार गार सरबत आणते. आलेच हं !" ती घाई-






अनुक्रमणिका

घाईने उठते. वसुधेच्या समोर फिल्मफेअरचा अंक आणि दोन मासिके ठेवून आत जाते.

वसुधा भूतकाळांतून स्वतःला सोडविण्याचा प्रयत्न करते. मनावरचा ताण झाडून टाकण्यासाठी उभी राहून आळस देते. उन्हे कललेली असतात. शनिवारी दुपारी ऑफिस लवकर सुटल्यावर मेट्रोला जाऊन पिक्चर टाकायचा वेत राहून गेला म्हणून तिला उगाचच हुरहुर वाटते. आपण शुभदाच्या मनमोकळ्या बोलण्याला फसलो आणि नकळत, इच्छेविरुद्ध तिच्या जवळ चाललो आहोत या जाणीवेची खंत तिचे मन पोखरत रहाते.

खोलीत नजर फिरविता फिरविता तिची नजर कोपऱ्यांतल्या जोडप्याच्या फोटोवर स्थिरावते. शुभदाच्या घटस्फोटीत नवऱ्याला पहायचे कुतुहल जागृत होते. ती हळूच कोपऱ्यात जाते. जवळ जाताच दचकते. तिच्या डोक्याला झिणझिण्या येतात. हातापायाची शक्ति एकदम नाहीशी होते. ती ताठरल्यासारखी त्या फोटोकडे पहात उभी रहाते.

सौ. शुभदा अविनाश देशपांडे.

अविनाश देशपांडे शुभदेचा नवरा होता. अविनाश—तिच्यावर जीवापाड प्रेम करणारा, तिच्यापासून दूर जाण्याच्या कल्पनेने कासावीस होणारा—तिला वाटलं होतं, अविनाश अविवाहित राहील तिच्या आठवणीने जळत, झुरत. पण अविनाशने लग्न केले होते–शुभदासारख्या सामान्य रुपाच्या प्रौढ स्त्रीशी. आणि ती—घटस्फोटाचा आग्रह धरणारी, अविनाशचा तिरस्कार करणारी ती—ती अजून अविवाहीत होती. लग्नाच्या विचाराने अस्वस्थ होत होती. तिच्याकडे आकर्षित झालेल्या विपीनला, तिच्या वडिलांच्या मित्राच्या मुलाला चार हात दूर ठेवत होती. कां ? विपीन लहानपणापासून तिच्या परिचयाचा होता. साधा, सरळ, प्रेमळ, पगारदार. दिसायला अविनाशहून रुबाबदार. तिला माहीत होतं, लहानपणापासून तो तिच्यावर प्रेम करत होता. पण मोठेपणी ते व्यक्त करताना त्याचा भिडस्त स्वभाव आड आला. हक्क दाखविण्याची, कोणाकडून काही मागून घ्यायची त्याची वृत्तीच नव्हती. त्याचे प्रेम माहित असूनहि तिने त्याच्याकडे दुर्लक्ष केले होते. तिचे तिलाहि कारण कळत नव्हते. एवढं खरं, त्याच्या सान्निध्यांत तिच्या भाववृत्ति फुलत नव्हत्या. गात्रागात्रांना मोहरून टाकण्याचे सामर्थ्य त्याच्या स्पर्शात नव्हते कीं तिच्यातच काही कमी होते ! तीच फ्रिजिड होती ! तिला फुलताच येत नव्हतं ! प्रतिसाद देता येत नव्हता ! दुसऱ्यात विलीन होऊन जाण्यासाठी लागणारी समर्पणाची वृत्ति, स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव हरवून जाण्यासाठी लागणारी तरलता, सहजता ! सारं तिच्यापासून दूर होतं.

शेजारच्या बंगल्यांत पेइंगगेस्ट म्हणून रहाणाऱ्या अविनाशने तिच्या वडिलांकडे

येऊन तिला मागणी घातली तेव्हा ती अशीच आक्रसून गेली होती कासवासारखी. मग अविनाशने तिच्याशी लग्न कां केलं ! कासवाच्या पाठीशी ! टणक ! निबरट ! पहिल्यांदा पुष्कळ तरुणी अशाच असतात. लाजऱ्या, बुजऱ्या, पुरुषांना घाबरणाऱ्या. हळूवार हातांनी त्यांना फुलवावं लागतं. त्यांना पुरुषाच्या बळ ट हाताचा आधार हवा असतो. त्यांना विश्वासात घ्यावं लागतं. आणि मग त्या हातावर त्या कायमच्या विसावतात—श्रद्धेने, प्रेमाने, स्वत:ला मोकळे करून. पण अशी एखादीच. स्वत:ला वेगळं ठेवण्यासाठी धडपडणारी, अविश्वास दाखविणारी. पुरुषाच्या पायाशी आपले जीवन वाहून टाकणे तिला जमत नाही. पुरुषाच्या कर्तृत्वावर भावडेपणाने श्रद्धा ठेवून त्याची पूजा करणे तिला असह्य होते. विशेषत: वसुधासारख्या मुलीला—एकुलती एक मुलगी म्हणून मुलासारखी वाढलेली. अस्मितेची प्रखर जाणीव जोपासणारी—अविनाश तिला आवडला होता, पुरुषाबद्दल वाटणारे स्त्र सुलभ आकर्षण त्याच्याविषयी तिला वाटले होते. तिला एकदम मागणी घालायला येण्याच्या त्याच्या धैर्याने ती त्याच्याकडे आकर्षित झाली होती. यौवनाच्या धुंदीत तिला त्याचा पुरुषी अहंकार जाणवला नाही. पण पहिले नाविन्य संपताच त्या अहंकाराने ती दुखावली जाऊ लागली. अविनाशबद्दलचा तिरस्कार तिच्या मनात घर करू लागला. ती बेफाम झाली. कोणाचंहि काही ऐकून घ्यायची तिची मन:स्थिति उरली नाही. आणि मग—मग घटस्फोट—हवेने टर्र फुगलेला फुगा फुटावा, मलूल होऊन पडावा तशी ती केविलवाणी झाली. तिचे आयुष्य तिला रितं वाटायला लागले. घटस्फोटाची, काहीतरी वेगळं करण्याची धुंदी उतरली. तारेला अडकून फाटलेल्या पतंगासारखं तिचं आयुष्य अर्थहीन फडफडत राहिले.

शुभदा सरबताचे पेले घेऊन येते.

"अरेच्चा ! तुमचे लक्ष गेलं वाटतं फोटोकडे. ह्यांना खरं म्हणजे भिंतीवर फोटो लावायला आवडत नाही. पण मीच हट्ट धरला आणि आमच्या दोघांचा फोटो फ्रेम करून घेतला. आणि मग कॉम्प्रमाइज म्हणून दारासमोर न लावता कोपऱ्यात लावला "

"घ्या नं सरबत. आणखी थोड्या वेळात येतीलच मि. देशपांडे. अनायसे तुमची ओळख होईल."

वसुधा सावध होते. अविनाशला भेटायच्या कल्पनेने उत्तेजित होते. घटस्फोट घेतल्याला तीन वर्षे झाली. तीन वर्षांत एकदाहि भेटला नाही. दिसला नाही. दुरूनसुद्धां. मनाच्या कोपऱ्यात सुप्त इच्छा होती, त्याने भेटावे, पूर्वीसारख खांदे पकडून गदगदा हलवावे. त्यांनी दूर व्हायचे ठरविले त्याच्या आदल्या दिवशीची रात्र. त्याच्या मिठीत ती गुदमरून गेली होती. त्याने आवेगाने घेतलेल्या चुंबनाच्या वेदना अजूनहि कधी जाग्या व्हायच्या आणि ती ? तिला सारं नको होतं ? त्याच्या शरीराच्या ऊबेनं ती तापत नव्हती ? वेडावून जात नव्हती? की, अस्मितच्या धुंदीत तिला हे काही जाणवलं नव्हतं ? आता आता या क्षणी अविनाश आला तर ! ती शहारते. शुभदेपेक्षा ती खूपच तरुण दिसत होती. आकर्षक होती. पण शुभदेची माया, शुभदेची समरसता—स्वत:च्या थंडपणाचा तिला राग येतो. कदाचित् त्या क्षणी अविनाश तेथे आला तर—नको नकोच ते. गेल्या दोन वर्षांत त्याला विसरण्यासाठी केलेला सारा प्रयत्न फुकट जाईल. अस्पष्ट होत चाललेल्या भूतकाळाला परत आकार यायला नको.

तिला शुभदेचा हेवा वाटतो. शुभदेवर ती विश्वासाने विसावणार होती. शुभदेबद्दल तिला अनामिक ओढ वाटू लागली होती. त्या शुभदेपासून तिला दूर जावं लागणार होतं. शुभदेशी मैत्री जुळवायला ती असमर्थ ठरली होती.

ती अजून ताठरलेली असते. तशीच सोफ्यावर यऊन बसते.

"हो. मलाहि आवडलं असतं त्यांच्याशी ओळख करून घ्यायला. पण घरी आई वाट पहात असेल. उशीर झाला तर बसलाहि गर्दी होईल. ती औपचारिक कोरडे बोलते."

"आईच वाट बघणार नं ! दुसरं नाही ना कोणी राणीसाहेबाच्या भेटीसाठी तिष्ठत बसलेले ?" ती थट्टेने विचारते.

वसुधेच्या हृदयांत कळ उठते. तिला नवीनच सत्य जाणवतं. ही शुभदा, तिच्या पूर्वीच्या नवऱ्याची बायको, अविनाशच्या शेज री झोपणारी. अविनाशच्या अंतरंगांचे कोनेकोपरे माहित असलेली. त्याचा भूतकाळ त्याने तिला सांगितला असणार: त्याच्या पूर्वीच्या बायकोबद्दल—तिच्याबद्दल, तिच्या कासवासारख्या वृत्तीबद्दल. तिला शुभदेची भीति वाटायला लागते. ती तिचा तिरस्कार करत असेल. तिला कल्पनाही नसेल, ही समोर बसलेली ती ती आहे. तिच्या अविनाशची पूर्वीची बायको अविनाशने शुभदेला खूष करण्यासाठी निचेवाईट चित्र शुभदेसमोर रेखाटलं असेल. शुभदेच्या सहवासांत तो तिच्या आठवणी विसरला असेल. जणू वसुधा नांवाची कोणी स्त्री त्याच्या जीवनात आलीच नव्हती. हे विसरणं इतकं सोपं असतं ! तिच्या मनात असूया जागी होते. शुभदेला तरी त्याच्या जीवनात पूर्वी येऊन गेलेल्या स्त्रीच्या अस्तित्वाची चाहूल लागायला हवी. तिच्या नवऱ्याच्या भावविश्वात तिला एकटीलाच स्थान नाही. तिचे पत्नीपद उष्टावलेले आहे. तिला याची जाणीव करून द्यायला हवी. तिला तो ताण सहन करणे अशक्य होते.

"अविनाश, अविनाश देशपांडेशी तुमचे लग्न झालंय् ?" तिच्या प्रश्नाला निर्वाणीची धार असते.

शुभदा दचकते. तिच्या नवऱ्याला एका परक्या स्त्रीने एकेरी हांक मारावी !

"कां ? अविनाश तुमच्या ओळखीचे आहेत ?" सूरात आश्चर्य व किंचित् राग.

"हो. एकेकाळी ते माझे पति होते." वसुधा एकाएकी भूतकाळात हरवून जाते. तिच्या स्वरांत विकलता जाणवते. अविनाशचे केसाळ पात्र आणि शरीराचा ऊबदार स्पर्श तिच्या आठवणींना छेदून जातो. तिच्यासमोर उभी असलेली शुभदा आज त्या स्पर्शाच्या अधिक निकट आहे. ती मत्सराने पेटून निघते. या स्पर्शाचा उपभोग घ्यायचा तिला काय अधिकार ! शुभदेचे सामान्यरुप आणि बोजड बांधा तीव्रतेने तिच्या डोळ्यांत भरतो. शुभदाच्या जवळ झोपताना अविनाशला तिची आठवण येत असेल ?

"म्हणजे, म्हणजे तुम्हीच अविनाशांची पूर्वीची बायको, घटस्फोट घेतलेली ?" शुभदा त्या अनपेक्षित धक्क्याने अस्वस्थ होते. अविनाशची पूर्वीची बायको, तिची सवत तिच्यापुढे उभी असते. उंच, शेलाटच्या बांध्याची, तिच्यापेक्षा कितीतरी आकर्षक. वसुधाच अविनाशांना छान शोभते. शुभदेला अपराधी वाटू लागते. अविनाश तिच्याबद्दल फारच कमी बोलत असत. ती इतकी चांगली असेल असे तिला वाटलं नव्हतं.

घटस्फोट शब्दाने वसुधा सांवरते. तिला आवेश चढतो.

"हो. मी घटस्फोट घेतला. त्याची अरेरावी, त्याची हुकूमशाही सहन नाही झाली मला. त्याचा पुरुषी अहंकार मला खुपत होता." ती एकाएकी भावनावश होते. तिचा त्वेष तिच्या मनांत मावत नाही.

शुभदा घाबरते. ते शब्द, तो त्वेष तिला नवीन असतो.







अनुक्रमणिका

"अरेरावी ! हुकूमशाही ! मला काहीच कळत नाही," तिचा आवाज पडला आहे. तिने कशाचा विचारच केलेला नाही. अविनाशचा पुरुषी अहंकार वगैरे तिला काहीच जाणवत नाही. तिला फक्त एवढंच माहित आहे. तिला अविनाश आवडतात. आणि त्याना–ती दचकत. अविनाशला ती आवडते का? तिला नक्की उत्तर सांपडत नाही. अविनाशचे तिच्यावर प्रेम आहे? ती गोंधळून जाते.

"अविनाशला वाटते, वायकोने सारखं आपल्याच तैनातीत रहावे. तिने नोकरी करू नये, स्वतःचे वेगळे कार्यक्रम ठेवू नयेत. तो म्हणेल तसं त्याच्या तालावर नाचावं. तुम्हाला हे पटतं ? वसुधाच्या बोलण्यात वकीली आवेश आले. बरेच दिवस साठवलेलं मनातलं दुःख भडाभडा बाहेर येतंय. तिने घटस्फोट घेतला तेव्हां सगळ्यांनी तिलाच दोष दिला. अविनाशसारख्या रुबाबदार, खेळकर स्वभावाच्या नवऱ्याला सोडून देणे कोणालाच पटले नाही. अविनाशच्या स्वभावात काही दोष असू शकेल हा विचार कोणाच्याहि मनात आला नाही. अविनाशची सगळ्यांवर छाप पडत असे. फरक इतकाच होता, तो सगळ्यांचा नवरा नव्हता. तिचा नवरा होता. नवरा म्हणून त्याचे व्यक्तिमत्व कोणाच्याच परिचयाचे नव्हते. त्यामुळेच तिची खूप कुचंबणा झाली होती. ती तिची बाजू कोणाला पटवून देऊ शकत नव्हती. कदाचित् कोणी तिची बाजू ऐकून घेतली असती तरी त्याला अविनाशच्या वागण्यात काही वावगं आहे असं वाटलं नव्हतं.

शुभदा गांगरून जाते. तिला खरंच अविनाशच्या तैनातीत राह्यला आवडत होतं. त्याला प्रत्येक गोष्टीत तिची मदत लागावी, त्याने तिच्यावर अवलंबून रहावे यांतच तिला तिचा विजय वाटत होता. तिला हे सारे वसुधाला सांगायचे होते. पण वसुधासारख्या आवेशाने तिला हे सारे सांगता येणार नाही याची तिला भीति वाटत होती. तिला वसुधाच्या तडफदारपणाचे कौतुक वाटले. तिला असा तडफदारपणा कधी दाखवताच आला नव्हता. ऑफिसमध्येहि ती फार मऊपणाने वागत होती. कोणाचे राहि- लेले काम सहजपणे करत होती. तिच्या हक्काची तिला कधी जाणीव झाली नव्हती. ती अवाक् होऊन वसुधाकडे बघत राहिली.

"तुम्ही कधी तुमच्या स्वतःचा विचार केलाय्? तुम्हाला काय आवडतं? तुमचे इंटरेस्ट काय आहेत? तुम्हाला असं कधी वाटत नाही कां, की तुमचे स्वतःचे असे वेगळे जग असावे, ज्यात तुमच्या नवऱ्याला स्थान नाही? तो मात्र ऑफिसात जाणार, ऑफिसच्या मित्रांबरोबर पिक्निक्ला जाणार, त्याच्या ऑफिसच्या कामामुळे त्याला घरी यायला उशिर होणार. आणि तुम्ही मात्र सदैव त्याच्या सेवेत तत्पर राहिले पाहिजे. तो घरी असताना मैत्रिणीकडे जाता कामा नये. महिला मंडळाची मिटींग बुडवायला लागली तरी हरकत नाही." तिला दम लागतो. खोली तिच्याभोवती गरगरत असल्याचा भास होतो.

शुभदेचा वसुधेबद्दल आदर वाढतोय्. स्वतःच्या मठ्ठपणाची तिला कींव येते. इतक्या गंभीरपणे विचार करायची तिला संवयच नव्हती. तिला पटतं, वसुधाच्या बोलण्यात बरंच सत्य आहे. अविनाश चांगला आहे. अविनाशने तिला सहानुभूति दाखविली. माहेरी आई आजारी आणि वडिल कामाच्या ओझ्याखाली वाकलेले. त्यामुळे तिच्याकडे आपुलकीने कोणीच लक्ष दिले नव्हते. ती पोरकी होती. अविनाशने तिच्या पोरक्या मनाला कुरवाळले. पण त्याच्या बदल्यांत–त्याच्या बदल्यात त्याने तिला दासी बनविले. या विचारासरशी ती दचकते. अविनाशचा हा डाव तिच्या लक्षात कसा आला नाही ! अविनाश तिला दुष्ट वाटू लागतो. तिच्या स्वातंत्र्याला नख लावणारा ! तिचे व्यक्तिमत्व गाडून टाकणारा ! तिनेहि त्याच्याशी घटस्फोट घेतला तर ! 'घटस्फोट' शब्दाने ती भारावते. क्षणभर तिच्यावर त्या शब्दांची मोहिनी पडते. आणि घटस्फोटानंतर–तिला लग्नापूर्वीचे दिवस आठवतात. लग्न जमता जमता नव्हतं. कंटाळवाणी नोकरी–असह्य एकलेपणा–बरोबरच्या कितीतरी मैत्रिणी लग्न होऊन आपापल्या संसारात रमल्या होत्या. आणि ती–ती एकटीच झुरत होती. अविनाश आले आणि तिच्या जीवनाला अर्थ आला. नाही ! नाही ! तो एकलेपणा सहन करायची तिच्यात ताकद नव्हती. अविनाशला सोडून जाणे शक्य नव्हते. त्यासाठी स्वतःचे व्यक्तीमत्व विसरायला ती तयार होती. व्यक्तीमत्व ! तिला कळत नाही. व्यक्तीमत्व म्हणजे काय ! आणि एकदम तिला जाणवतं. तिच्या पोटात अविनाशचा अंकुर वाढतोय. ती केव्हाच अविनाशमध्ये विरून गेली आहे. छे ! तिला त्याला सोडून जाता येणे शक्यच नव्हतं. तिच्या मनाचा ताण सैल होतो.

वसुधा व्याकुळ झाली आहे. तिचा आक्रोश शुभदेच्या डोक्यावरून तर जात नाही ! शुभदेलाहि अविनाशच्या वागण्यात काहीच वावगे वाटत नाही ! की तिचंच चुकतंय् ! तीच मनस्वी आहे !

"अविनाश तुम्हाला नोकरी सोडायला सांगतोय् याचाच अर्थ असा नाही का की, त्याला तुम्ही दुसरीकडे लक्ष दिलेले आवडत नाही. तुमच्या स्वातंत्र्याची त्याला किंमत नाही !" वसुधा विकल होऊन विचारते. तिचा दम संपलेला असतो. शुभदेला, तिला अविनाश नवरा म्हणून परिचित आहे तिलाहि तिची बाजू समजा-

**बायकांचे बंड !**



भारताचा पंतप्रधान 'स्त्री' आहेना त्याचा हा परिणाम, बरंका !

वून देण्यात ती असमर्थ ठरली याचे तिला दुःख आहे.

"असेलहि कदाचित् तसं. पण खरं म्हणजे मलाहि नोकरीचा कंटाळा आलाय्. शिवाय आता नोकरी सोडायला लावण्यासारखं कारणहि लवकरच घडणार आहे." तिच्या स्वरात हळुवारपणा आहे. अगदी सहजपणे ती बोलून जाते.

वसुधा चमकते. तिचा सगळा त्वेष गळून पडतो. अविनाशचे बाळ शुभदेच्या पोटी जन्म घेणार आहे. अविनाश—अविनाश एकेकाळी तिचा होता. त्याच्या बाळाची ती आई झाली असती. कदाचित्—कदाचित् मग तिच्यावर हा घटस्फोटाचा प्रसंग आलाच नसता. बाळाचे कौतुक करता करता ती स्वतःला विसरली असती. अविनाश, ती आणि त्याचे बाळ असे छोटसं गोड विश्व तयार झाले असते. आणि मग दवबिंदुने सूर्यप्रकाशांत विरून जावं तितक्या सहजपणे ती त्या विश्वात एकरूप झाली असती. तिच्या हे कधी लक्षात कसं आलं नव्हतं! उलट लग्न झाल्यावर लगेच बाळ नको म्हणून तिनेच अविनाशचे मन वळविले होते. आणि घटस्फोट घेताना तो एक पाश आपण अडकवून घेतला नाही म्हणून तिला हायसं वाटलं होतं.

तिने जे नाकारले होते ते शुभदेने स्वीकारले होते. त्या क्षणी शुभदेचा तिला विलक्षण राग आला. अविनाशच्या शय्येवर शुभदा झोपत होती. अविनाशच्या गळयात हात टाकून. ती कल्पना तिला सहन होईना. तिला प्रकर्षाने जाणवले. अविनाशशिवाय दुसऱ्या कोणाबरोबर रात्र घालविणे तिला अशक्य होतं. तिच्या रात्रीना अविनाशच्या शरीराचा स्पर्श होता, अविनाशच्या घामाचा गंध होता. तो ती पुसू शकत नव्हती. तिची रात्र अविनाशशिवाय रंगली नसती. पण अविनाशच्या रात्री तिच्याबरोबर रंगत होत्या कां? कां तो कासवाच्या पाठीशी शृंगार करत होता? एक दिवस अविनाशहि कंटाळला असता आणि दुसरीकडे गेला असता तर?

वसुधा तिरीमिरीने उठते. तिला आता तेथे बसणे शक्य नसते. शुभदाच्या चेहेऱ्यावर स्वप्न पहात असल्याचे मंद स्मित तरळत असते.

"बरं मी येते."

"हें काय? चाललात!" शुभदा स्वतःला सांवरून विचारते.

"हो." वसुधेचा पाय अडखळतो.

"माझे एक काम कराल?" तिचा स्वर आर्त होतो. मगाचा तडफदारपणा विरघळून गेला असतो. "मी येऊन गेल्याचे अविनाशला सांगू नका, प्लीज." दुसऱ्या क्षणी ती दाराबाहेर पडते.

शुभदा तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहाते. तिच्या मनांत सहानुभूति द्रवत असते. ●●●






## फक्त एकच मिनीट

रात्री मीटिंगहून घरी जायला मंत्रीमहाशयांना उशीर झाला होता आणि एक झिंगलेला माणूस रस्त्याने जात असलेला त्यांना दिसला. त्यांनी मोटार थांबवली व त्याच्या घराचा पत्ता विचारून त्याला घरापर्यंत सोडले. तेव्हा त्या दारुड्याने मंत्री महाशयांना आत येण्याची विनंती केली.

"नको आता फार उशीर झालाय् अन् उद्या सकाळी मला लवकर उठायचंय." मंत्री महाशयांनी सबब सांगितली.

"एक मिनिट फक्त. मी कुणाबरोबर होतो, ते माझ्या बायकोला दाखविण्यासाठीच फक्त." तो दारुडा म्हणाला.

☆ ☆ ☆ ☆

## बरोबर आहे ते

"हे काय साहेब," टांगेवाला म्हणाला, "बाईसाहेबांनी तर काल मला सव्वा रुपया दिला होता."

"मग बबरोर आहे ते !" तो म्हणाला, "कारण बाईसाहेबांना श्रीमंत नवरा मिळाला आहे, पण मला मात्र उधळी बायको मिळाली आहे."

☆ ☆ ☆ ☆

## केवळ त्यांच्यासाठी

"येथले लोक कसे आहेत ?" आदिवासींच्या भागात दौरा करणाऱ्या एका बंदूकधारी माणसाला विचारण्यात आले.

"अगदी गरीब, प्रामाणिक आहेत." तो बंदूकवाला म्हणाला.

"मग ही बंदूक घेऊन तू कशाला फिरतोस ?"

"त्यांना गरीब-प्रामाणिक ठेवायला."

☆ ☆ ☆

## अरेरे !!

"तुमच्या गळ्यातल्या लॉकेटमध्ये काय आहे ?"

" 'ह्यां'चे केस आहेत त्यात. आठवण म्हणून ठेवले आहेत."

"पण तुझे 'हे' तर अजून जिवंत आहेत."

"होय, पण त्यांचे केस गेलेले आहेत."

☆ ☆ ☆ ☆

## ते आधी ठरवू या

गोटुमल शेट मृत्युशय्येवर पडलेले होते आणि आपल्या अंतिम इच्छा ते आपल्या पत्नीजवळ व्यक्त करीत होते. ते म्हणाले, "माझ्या पश्चात् हे घर किसनला द्या."

"किसनला कशाला ?" त्यांची पत्नी म्हणाली, "त्याला शेतं हवीत."

"बरं, आपलं दुकान मोतीलालला द्यावे."

"दुकान मोतीलालला ? त्यापेक्षां रामलाल दुकान चांगलं चालवील."

"बरं," गोटुमल संमति देत म्हणाले, "पण आपली माल लॉरी मात्र रमणला द्या."




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

"रमणला कशाला ?", बायको म्हणाली, "त्यापेक्षां आपण ती नेमीचंदला देऊं या."

"मला एक सांगतेस कां ?", "मरणार आहेस तू कां मी," गोटुमल कण्हत म्हणाले.

☆ ☆ ☆ ☆

## संगीत-घड्याळ

मध्यरात्र उलटून गेली होती. एक गवई आपल्याकडे आलेल्या एका मित्राला संगीताची महति सांगत होते. बोलतां बोलतां ते म्हणाले, "अहो ! एवढंच काय, पण संगीतामुळे किती वाजले आहेत, हे देखील कळतं !"

"छट्, हे कसं शक्य आहे ?" मित्र म्हणाला.

"दाखवतोच तुम्हांला प्रत्यक्ष." असे म्हणून गवईबुवांनी तंबोरा घेतला आणि अडाणा गावयास सुरुवात केली. त्यांनी एक चांगली खडखडीत तान मारताच भिंतीवर जोरजोराने धक्के बसू लागले आणि त्यामागोमाग शब्द आले "अहो, आम्हाला जरा स्वस्थ झोपू द्याल की नाही ? आता रात्रीचा दीड वाजला आहे !"

त्याबरोबर बुवांनी आपल्या मित्राकडे विजयी दृष्टीने पाहिले आणि तंबोरा खाली ठेवला.

☆ ☆ ☆ ☆

## कमाई

"ठीक आहे. तुमच्याशी मी माझ्या मुलीचं लग्न लावलं तर आता तिला ज्या गोष्टी मिळत आहेत, त्यापेक्षा जास्त चांगलं असं तुम्ही काय देऊ शकाल ?"

"मला वाटतं, तिचं नांव निश्चितच चांगलं होईल. 'गबाळे'-पेक्षा 'विचारे' हें नांव चांगलं नाही कां ?"

☆ ☆ ☆ ☆

## कार्यक्षम वीज

एका वीज कंपनीने विजेच्या घरगुती उपकरणांचा खप वाढावा म्हणून पुढीलप्रमाणे जाहिरात दिली.

आपल्या पत्नीला<br>
घरकामाच्या त्रासाने<br>
मारून टाकू नका—<br>
वीज ते काम करील.

—श. शि. पंढारकर








अनुक्रमणिका

# हैद्राबादची वारी—एक वारकरी

**४६ वे** मराठी साहित्य संमेलन हैद्राबाद येथे डिसेंबरच्या २५,२६ व २७ तारखेस पार पडले. आणि गाजले! (असं म्हणण्याची पद्धत आहे नाही का?) मराठी साहित्य संमेलनात व्याख्याने, परिसंवाद (त्यातही "नवकाव्य" एक सनातन व चविष्ट विषय.) सांस्कृतिक कार्यक्रम हे सर्व ठरल्याप्रमाणे (पण कमजास्त उत्साहांत) साजरे होतात, आणि तरीहि बऱ्याच वेळा त्यात काही उणीवा जाणवतातच. हैद्राबाद येथील साहित्य संमेलन हे अनेक दृष्टीने वेगळे ठरले. साहित्य महामंडळातर्फे आयोजित झालेले हे पहिले अधिवेशन, वा. लं. चे संपूर्ण साहित्यिक (व विचारपूर्ण) भाषण (अगदी डोक्यावरून गेलं अशी एक तक्रार) आणि संमेलनाच्या कार्यक्रम पत्रिकेस प्राप्त झालेले वेगळे स्वरुप. या सर्व वैशिष्टयांमुळे यंदाचे संमेलन बरेच गाजले.

मराठी साहित्य संमेलनाला उपस्थित राहणारे सर्वच प्रतिनिधि हे मराठी साहित्याचे रसिक, जिज्ञासू असतातच असे नाही (पुष्कळदां नसतातच!) ह्या दृष्टीकोनातून पाहिल्यास अशा उपस्थितांचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण करता येईल.

(१) साहित्यिक मंडळी (प्रसिद्ध लेखक, प्राध्यापक वगैरे)

(२) मराठी साहित्याचे रसिक (यात होतकरु लेखक, मराठीचे विद्यार्थी, मराठी साहित्याचे जिज्ञासू यांचा समावेश होऊ शकेल)



'शोधक' वा. ल. कुळकर्णी

आणि (३) संमेलनाला साहित्याव्यतिरिक्त इतर प्रलोभनांनी झालेले उत्साही लोक (दिल्ली, गोवा, हैद्रावादला एवढी उपस्थिती का? याचे उत्तर.) साहित्यिक मंडळींविषयी काही लिहिणे योग्य नाही. कारण ह्या मंडळींना बहुधा (प्रवासखर्चासह) आमंत्रणे गेलेली असतात आणि संमेलनांत तीं मानकऱ्यांच्या गौरवाने वावरतात. त्याच प्रमाणे तिसऱ्या वर्गातील (रेल्वेच्या नव्हे!) उत्साही मंडळींविषयीही काहीं लिहिण्याची जरुरी नाही कारण साहित्य संमेलन कसे पार पडले, याची ह्यांना चिंता नसते (फक्त आपला 'प्रोग्रॅम' व्यवस्थित 'पार पडला' याचे त्यांना समाधान असते.) अपेक्षा, जिज्ञासा असते ती दुसऱ्या वर्गातील सामान्य प्रतिनिधींची—जे काही विशिष्ट दृष्टिकोन, कल्पना, जे अंदाज डोळयासमोर ठेवून (किंवा मनाशी बाळगून) साहित्य संमेलनाला जातात. त्यांच्या ह्या अपेक्षा ह्या कल्पना प्रत्यक्षांत कितपत सार्थ ठरतात हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

मराठी साहित्य संमेलनात मराठीच्या साहित्य प्रांतांतील प्रत्येक विभागाविषयी चर्चा व्हावी ही अपेक्षा अगदीच चुकीची ठरणार नाही. त्या दृष्टीने यंदाच्या संमेलनांत कादंबरी, नाटक, लघुनिबंध (मेला अशी कांहींचे मत) यांची दखल घेतली गेली नाही. त्या दृष्टीने 'आजचे नाटक' 'आजची कादंबरी' ह्या विषयी परिसंवाद कां ठेवण्यात येत नाही याचे आश्चर्य वाटते. काव्या प्रमाणेच नाटक, कादंबरी, लघुनिबंध या संबंधातही (व यांच्या लेखकासंबंधीही) काही अपेक्षा व अडचणी असतात (कदाचित् नवकाव्याची दुर्बोधता त्यात नसेल.) त्याचा विचार साहित्य संमेलनांत अवश्य व्हावयास पाहिजे. यंदाच्या संमेलनात कवि व कविता, अपेक्षा व अडचणी, या विषयावर परिसंवाद आयोजित केला होता. त्यात विंदा करंदीकर, वसंत बापट, प्रा. कुरुंदकर व (पाहुणे कलाकार म्हणून) प्रा. रा. श्री. जोग वगैरेंनी भाग घेतला होता. प्रा. रा. श्री. जोगांनी आपली 'मुख्यार्थाची कैफियत' परत एकदा मांडली. विंदा करंदीकरांचे निबंध वाचन (म्हणजे भाषण) दुर्बोध वाटले (नसते तरच नवल—काव्याप्रमाणेच काव्यटीकाही इतकी दुर्बोध हवीच काय?) या परिसंवांदात भाग घेणारे पुष्कळसे नवकवीच असल्याने, काव्यातील दुर्बोधता ही वाचकांच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून आहे, काव्यातील अर्थ स्पष्ट करणे ही कवींची जबाबदारी नाही, इत्यादि गोष्टींचेच समर्थन केले गेले. खरोखरच अशा "प्रतिष्ठित" साहित्यिकांनी असल्या प्रकारचे निवेदन केले म्हणजे नवल वाटते. सोप्या, सोप्या भाषेत आपले विचार यांना मांडता येतच नाहींत काय? (मग श्रोते आणि वाचक मिळतील ना?) ह्या संदर्भात श्री. ह. रा. महाजनी यांनी रविवार दि. २–१–६५ च्या 'लोकसत्ते'त मांडलेले विचार मननीय (ह्या नवकवींच्या दृष्टीनेही) आहेत (जिज्ञासूंनी तो लेख वाचावा).









अनुक्रमणिका

१९५० साली मुंबई येथे झालेल्या साहित्य संमेलनांत काव्यशाखा अध्यक्ष कै. मर्ढेकर यांच्या नवकाव्यावरील दुर्बोध भाषणावर आचार्य अत्रे यांनीहि असाच कडाडून हल्ला केला होता व नवकवींच्या काव्या प्रमाणेंच त्यांचे काव्यविषयक समर्थनहि दुर्बोध असते हीच तक्रार केली होती. अध्यक्ष वा. ल. कुळकर्णी यांनी म्हटल्याप्रमाणे नवकाव्याचा 'आशय' ती प्रसिद्ध करणाऱ्या संपादकांनी स्पष्ट करण्याची वेळ आली आहे. (अर्थात त्यासाठीं त्यांनी कोणत्याही कवीची मात्र नेमणूक करू नये ही विनंती.) सामान्य माणसाची अपेक्षा या परिसंवादाने पूर्ण झाली नाही असें नाइलाजाने म्हणावे लागते.

यंदाच्या संमेलनाचे खास वैशिष्टय म्हणजे '१९४७ नंतरची मराठी कथा' हा परिसंवाद ! ह्या परिसंवादात मराठी, हिंदी, तेलगू, कानडी इ. भाषेतील प्रसिद्ध साहित्यिकांनी भाग घेतला होता. भाषा भगिनींचे हे मीलन खरोखरच कौतुकास्पद आहे. ह्या कल्पने-मागील हेतु स्तुत्य व अभिमानास्पद आहे. मराठीच्या व्यासपीठा-वर तिच्या इतर भाषाभगिनीहि विराजमान झाल्यास कोणास आनंद वाटणार नाही ? मात्र ह्या कल्पनेमागील हेतु नीट स्पष्ट करणे आवश्यक आहे. केवळ हैद्राबादसारख्या महाराष्ट्राबाहेरील एका गांवीं हे संमेलन भरविले गेले म्हणून तर ही कल्पना सुचली नसेल ना ? अशी एक शंका मनास चाटून जाते. तसे नसेल तर ह्यापुढे जिथे म्हणून संमेलन होईल (मग ते अहमदाबाद, पुणे, कलकत्ता येथें भरो) तेथे त्या त्या प्रांतातील भाषाभगिनींना असे महत्त्व देणे प्राप्त ठरेल. (हिंदीला तर सर्वच संमेलनांत पाचारण करावे लागेल) हें तत्त्व म्हणून स्वीकारलें तर मराठी महामंडळाने व तिच्या इतर घटक संस्थांनी ह्या दृष्टीने पावलें टाकणे आवश्यक आहे. त्या दृष्टीनेंच महाराष्ट्र साहित्य पत्रिकेंत हिन्दी, तेलगू, कानडी इत्यादि भारतीय भाषेंतील त्या वर्षातील उत्कृष्ट कथा अगर इतर साहित्याचा मराठींत अनुवाद करून प्रसिद्ध केल्यास एक स्तुत्य उपक्रम होईल. व इतर भाषेतील साहित्याची मराठी वाचकास माहिती होईल. ह्या परिसंवादात एक उणीव जाणवली ती अशी की, वक्त्यांची भाषणे इंग्रजींतून झाल्याने पाहिजे तसा प्रभाव श्रोत्यांवर पडला नाही. (इंग्रजी हटाववाल्यांच्या हाती एक कोलीत) अध्यक्षांनी समारोपात तरी सर्व वक्त्यांच्या भाषणाचा सारांश सांगावयास पाहिजे होता (किंवा इतर कोणी सांगितला असता तरी चालले असते.) मराठीच्या उच्च अभ्यासासाठी अशी एकादी मध्यवर्ति संस्था असावी कीं, ज्या संस्थेंत सर्व भारतीय भाषांच्या अभ्यासाची सोय होऊ शकेल. प्रा. वा. ल. कुळकर्णी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत याचा आवर्जून उल्लेख केला आहे. आणि म्हणून त्या मार्गाने प्रगतीचे पाऊल उचलणे हे महामंडळाचे कर्तव्य ठरते. नाहीतर केवळ "हैद्राबादचे स्थान महात्म्य" म्हणून ही कल्पना निर्माण झाली. ते एक फॅड होते असे म्हणणे भाग पडेल. (मराठी वाङमयेतिहासाची योजना प्रत्येक संमेलनांत येते आणि 'सरकारी' पद्धतीने गडपही होते).

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व आचार्य अत्रे यांची भाषणे गाजली. (एक डोक्यावरून गेल्याने व दुसरे 'हंशे' घेऊन) सत्य, अहिंसा, अस्तेय, ब्रह्मचर्य ह्या गोष्टी व्यवहारात कशा फोल आहेत हे विनोदाच्या सहाय्याने अत्र्यांनी उत्तम रीतीने पटवून दिले. सतत १।।। तास त्यांनी श्रोत्यांना हंसवीत ठेवले (अगदी हैद्राबाद दणाणून सोडले !) पण एवढे करूनही 'विनोद म्हणजे काय पांचटपणा आहे ? विनोद म्हणजे काय चेष्टा आहे ?" अशा प्रकारची तंबीही दिलीच. (अर्थात श्रोत्यांना !)

यंदाच्या साहित्य संमेलनांतील अत्यंत दुर्दैवाची गोष्ट म्हणजे 'संमेलन, केशवसुतांना विसरले !' (त्यांची शताब्दि ह्याच सालांत येते) केशवसुतांची उपेक्षा त्यांच्या हयातीत बरीच झाली असा विचार श्री. वा. ल. कुळकर्णी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात प्रस्थापित केला आहे. पण आज तरी आम्ही त्यांची कितपत बूज राखली आहे ? कोठल्याही वक्त्याने कोणत्याही कार्यक्रमाचे संदर्भात त्यांचा उल्लेख करू नये ? त्यांच्या विषयी कोठलाही ठराव संमेलनापुढे येऊं नये ? मोठ्यांच्या हातून अशी चूक घडते याचे आश्चर्य वाटते. (की अध्यक्षीय तळमळ केवळ 'शाब्दिक' म्हणायची ?)

प्रसिद्ध साहित्यिक व सामान्य प्रतिनिधि यांच्या परिचयाचा एक अनौपचारिक कार्यक्रम संमेलनांत असावा. म्हणजे सामान्य वाचक व साहित्यिक अधिक जवळ येतील. (निदान कोण कोण लेखक संमेलनाला येऊन गेले हें तरी वाचक श्रोत्यांना कळेल.) संमेल-नात अनेक प्रकाशकांचे स्टॉल्स होते. लेखक, प्रकाशक व वाचक यांचा घनिष्ट संबंध असतो. (पुण्याच्या "त्या" सुविख्यात प्रकाशक–लेखक संमेलनांत हे प्रसिद्ध झाले आहेच म्हणा !) त्याच प्रमाणे वृत्त-पत्रकार, मुद्रक यांचाहि साहित्याशी जवळचा संबंध असतो. त्या दृष्टीने ह्या मंडळींनाहि परिसंवादांत स्थान देणे किंवा त्यासाठी एखादा वेगळा कार्यक्रम आयोजित करणे योग्य ठरेल.

आता यापुढे साहित्य संमेलन महामंडळ आयोजित करणार. तेव्हां आपले ध्येय साध्य होण्याची साहित्य संमेलन ही महत्त्वाची घटना आहे. केवळ 'वार्षिक मेळावा' नाही याची जाणीव बाळगणे इष्ट आहे. साहित्य संमेलनात मांडलेल्या कल्पना, संमत झालेले ठराव प्रत्यक्षांत आणण्यासाठी मंडळाने अध्यक्षांच्या सहकार्यानें व त्यांची प्रचारशक्ति पणाला लावून प्रयत्न केले पाहिजेत तरच त्या मागचे उद्दिष्ट साध्य होईल. मध्यवर्ति सदर्भ ग्रंथालय, वाङमये-तिहासाची योजना ह्या अद्याप पुऱ्या व्हावयाच्या आहेत.

मुंबई केंद्रावर मराठीला मानाचे स्थान असावे, आकाशवाणी ही स्वायत्त संस्था असावी हा ठराव अत्रे–पु. लं.नी गाजविला. राज्यशासनात मराठीचा लवकरात लवकर अंतर्भाव व्हावा हा ठराव अत्रे–तर्कतीर्थ यांनी गाजविला. काही ठिकाणी अत्रे यांचा तोल सुटतो आणि मग श्रोत्यांपैकींच काहींना अखेर 'आत्रेय धाष्टर्य' दाखवावे लागते. असा अनुभव ह्या ठरावांवरील भाष-णांच्या कार्यक्रमाचे वेळीं आला. (मग अत्रे निघून गेले) ह्या दोन ठरावांनी मराठी साहित्याच्या (आणि साहित्यिकांच्याहि) आकांक्षा उंचावल्या आहेत हे निश्चित. [फक्त 'बहिष्कार' वगैरे काही "स्फोटक" करायला सांगू नका बुवा अशी विनंती बऱ्याच जणांनी पु. लं. ना केल्याचे (खाजगीत) ऐकतो]

केवळ परिसंवाद, व्याख्याने, सांस्कृतिक कार्यक्रम (म्हणजे बहुधा नाटक–तेही देणगीसह) हा संमेलनाचा सांचा आता बदलणे आवश्यक वाटते. काही नवीन उपक्रमांची सुरुवात आता झाली पाहिजे. संमेलनासाठी महाराष्ट्रातून व महाराष्ट्राच्या बाहेरून अनेक लेखक कवि येतात. पण संमेलनांत मात्र काही 'बड्या'

[पृष्ठ ६५ वर पहा]








# भारत-पाक युद्ध

## एक वेगळा विचार

—वसंत फेणे



**सप्टेंबर** पासष्टमध्ये तीन आठवडे का होईना भारत–पाक युद्ध झडलेच. त्यांत आपल्या जवानांनीं भीम पराक्रम गाजविला. त्या पराक्रमाचे धगधगते रूप पाहून भारतीय जनता उचंबळली. भारताला स्वातंत्र्य लाभले तेव्हां अशा प्रकारचा आनंद भारतीय जनतेनें अनु-भवला होता. हा पराक्रमच असा होता की, ज्याचे पोवाडे शतशतकें गावेत.

आपण सारे खूष झालों कारण भार-तीय जवानांनी पॅटनचे टिनपाट केले; सेबरचीं शकलं केलीं. खरोखरच अजेय समजल्या जाणाऱ्या अमेरिकी रण-गाड्यांचे खेमकरणला खिमाकरण झाले!

या तीन आठवड्यांत जे काही झाले त्याने पूर्वेला पेकिंग थरकलें अन् पश्चि-मेला पेण्टेगॉन चरकले. याचे कारण मात्र भारतीय सेनेचा पराक्रम एवढेच नव्हते. त्याला तसेच महत्त्वाचे कारण आहे. आणि माझ्या मते भारत पाक युद्धातील सर्वांत महत्त्वाची– ऐतिहासिक महत्त्वाची घटना तीच आहे.

### आपले ऐतिहासिक वर्म

पेकिंग किंवा पेण्टेगॉन येथे भारतासंबंधी जीं धोरणें आंखली जातात तीं भारताचा भौगोलिक नि त्याचप्रमाणे ऐतिहासिक संदर्भ लक्षांत घेवूनच आणि हे संदर्भ तेथील धोरणाचे विधाते उत्तम रीतीने जाणतात. भारताचा ऐतिहासिक संदर्भ वरवर चाळला तरी काय दिसून येते ?

भारताच्या इतिहासाचीं पाने चाळली तर डोळ्यांत बोटे खुपसावीत तशा परकी-यांच्या स्वाऱ्या डोळ्यांत खुपतात. अले-क्झांडरपासून आयुबखानपर्यंत गेलीं दोन हजार वर्षे परकीयांनी वेळोवेळी आपल्यावर स्वाऱ्या केल्या. त्यांतील कोणी सुसंस्कृत तर कोणी असंस्कृत; कोणी स्वदेशीं थारा असलेले तर कोणी स्वदेशातून परागंदा झालेले. अशा स्वाऱ्यांशी भारतीयांनी मुकाबला केला. कधी ते जिंकले, कधी हरले. उत्तरोत्तर अधिकाधिक हरले अन् गेल्या हजारभर वर्षांत तर अधिकतर काल परकीयांच्या गुलामींत किंवा गुलामीच्या छायेत वावरले !

आपल्या 'दिव्य पूर्वा'ची थोरवी गातां-नाहि ज्याचें विस्मरण होता कामा नये असें हें सत्य आहे !

या 'स्वाऱ्यां'च्या संबंधांत आणखीनहि एक सत्य लक्षांत ठेवावयास हवें. तें म्हणजे या 'स्वाऱ्यांशी मुकाबला केवळ भारतीय भूमीवर झाला ! आक्रमकांवर प्रहार करण्यासाठीं भारतीय सैनिक कधीहि सीमापार करून गेला नाही. जे कांही पानिपत व्हायचे ते याच पुण्यभूवर ! याहि दृष्टीने आपण परदेशगमन गर्हणीय मानले किंवा काय नकळे ! हें आपले ऐतिहासिक वर्म.

पण भारताच्या इतिहासाचे हेंच मर्म आहे असें पेकिंग, पिंडी आणि पेण्टेगॉन मानत होती. आणि रास्तपणे मानत होती

### वेगळे वळण लावणारे पाऊल

इतिहासात शत्रूवर प्रहार करण्यासाठी भारतीय सेनेने सीमापार पाऊल ठेवले ते गेल्या वर्षीच्या पांच–सहा सप्टेंबर या मंगल दिवशीं. जे शतशतकांत घडले नव्हते तें त्या रात्रीं घडले. ही 'अनैतिहा-सिक' घटना पाहून कालपुरुषहि अचंबित झाला असेल; अन् चकित चकिता दृष्टीनें क्षणभर थबकलाहि असेल ! आपले केवढे भाग्य की, या दिवशीं भारताचे नागरीक म्हणून आपण जगत होतो. भावी पिढ्यांनी आपला हेवा करावे असें हें महद् भाग्य !

लढाईच्या तीन आठवड्यांत आपल्या सेनेनें जेवढ्या विमानांचा आणि रण-गाड्यांचा नि पाक फौजेचा फडशा पाडला त्याच्या दुप्पट तिप्पट संख्येने तसा नाश आपल्याच भूमीवर होता तरी त्याचे एवढे कौतुक वाटले नसते. उलट पाजलें त्या-हूनहि कमी पाणी पिंडीला पाजून इच्छो-गिल कालव्यावर भारतीय जवानांनी ठाण मांडले असते तरीहि त्याचे महत्त्व रतिमात्र कमी झाले नसते. कारण इच्छो-गिल कालव्यावर ठाण मांडून भारतीय जवानांनीं जगाला बजावले आहे: 'दोन हजार वर्षांचा 'तो' इतिहास आतां विसरा. हा नवा भारत आहे. हा जवान भारत आहे !'

आणि नेमक्या याच नवदर्शनाने भार-ताला 'ओळखून' आहोंत असं म्हणणाऱ्या साऱ्याच देशांना भारताचा नव्याने विचार करावा लागणार आहे. पेकिंग–पेण्टेगॉन अस्वस्थ झाली याचे महत्त्वाचें हें कारण आहे.

## सामाजिक पातळीवरहि नवा निर्णय हवा

या वेळीं भारतीयांनी देखील नव्याने विचार करावयास हवा. वरील प्रकारचा महान् ऐतिहासिक निर्णय राजकीय पातळीवर घेतला गेला. त्याला साजेसा अनुपूरक असा सामाजिक निर्णयहि घेतला गेला पाहिजे.

इतिहासाकडे पुनः एकवार दृष्टी टाकून भारतीय समाजाचा विचार करतां काय आढळते ? आढळते तें हेंच की शतका शतकापासून भारतीय समाज शतखंड झालेला आहे. चातुर्वर्ण्यातून निर्माण झालेल्या जाती आणि प्रादेशिकता यांच्या उभ्याआडव्या घावांनी हा समाज छिन्नविच्छिन्न झालेला आहे. त्यांत एकसंधपणा, एकरसपणा असा राहिला नाही. 'विविधतेतील एकता' वगैरे गोष्टी बोलण्यास गोड अन् ऐकावयासहि गोड वाटतात. परंतु वास्तवांत विविधतेपेक्षा अन्–एकताच इथें आढळतें. डोळ्यांत भरते. मग त्यांतून दुबळ्या एकतेचा शोध घ्यावयाचा. जगांतील इतर देशांत उच्चनीच भाव जरुर आहेत. परंतु शतकानुशतकें चाललेल्या जात्यधिष्ठित उच्चनीचपणाच्या भावनेनें खंडखंड झालेला समाज असलेला देश भारताशिवाय या पृथ्वीच्या पाठीवर अन्य नाही!

## फुटीरपणा आणि दंभ यांची जननी

कोणे एके काळीं चातुर्वर्ण्य चांगलें होतें–आदर्श होते असे त्याचे गोडवे गाईले जातात ! पूर्वजांबद्दलच्या आदरामुळे असें होत असावे. नाहीतर ज्या समाजव्यवस्थेतून कित्येक शतकें समाजाचीं शकले उडविणारा रोग निर्माण होऊं त्याबद्दल गोडवे कां बरें गावे ! या रोगाने निर्माण केलेल्या द्वैताबरोबर समाजाला गळ्यापर्यंत बुडविणारा दंभहि निर्माण केला आहे. या दंभामुळेच अद्वैताचे महान तत्त्वज्ञान सांगणारें, तत् त्वमसि' म्हणून म्हणणारे समाजातील कित्येकांची सावलीहि अंगावर पडूं देण्यास तयार नव्हते ! 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते–' असं म्हणून आपल्याच समाजांतल्या काही स्त्रिया दृष्टीस पडल्या तर त्यांची लाजहि दृ टीस पडायला हवी असें प्रामाणिकपणे मानत होते. याच दंभामुळे 'आध्यात्मिकदृष्टचा आम्ही फार पुढे गेलो आहोंत; ऐहिक गोष्टींची आम्हाला आसक्ति नाही' अशी कांहीशी–पण निःसंशय खोटी भावना आपण वाळगत आलों. त्यामुळे ऐहिक प्रगति होऊं शकली नाही अन् आध्यात्मिक प्रगति तर नव्हतीच. (ती जर खरोखरच होती तर त्याचे प्रतिबिंब समाजांत जरुर पडले असते !)

तें काही असलें तरी एक गोष्ट स्वच्छ आहे. गेल्या कित्येक शतकांपासून फुटीरपणा हेंच भारतीय समाजाचे व्यवच्छेदक लक्षण बनले आहे. देशांत परकीयांची राज्यें शतकानुशतकें नांदू शकली. विस्तारूं शकलीं याला फुटीरपणा मोठ्या प्रमाणांत कारणीभूत आहे. आणि महात्मा बुद्धापासून स्व. डॉ. आंबेडकरांपर्यंत अनेक महापुरुषांना पचवून तो परिपुष्ट झाला आहे. त्यांतूच भरीस भर म्हणून निरनिराळ्या धर्मांचीहि गर्दी आहेच.

## सुधारणेचा विचार 'आज'च्या संदर्भात हवा

आज जातीयपणा तसा राहिला नाही असें पुष्कळ वेळां म्हटलें जातें. ऐकायलाहि तें बरें वाटतें. आपण आतां सुधारत आहोंत असा समाधानकारक दिलासा आपल्याला मिळतो. गतकाळाशी तुळून पाहतां वरील म्हणणें थोडें फार खरें आहे. पण आपल्या 'सुधारणे'चा विचार 'काल'च्या संदर्भात करून उपयोगी नाही. तो 'आज'च्या संदर्भातच केला पाहिजे. आणि तो तसा केला म्हणजे अणुशक्तीच्या अवकाशयानाच्या आणि मुख्य म्हणजे लोकशाहीच्या 'आज'च्या अनुबंधात अस्तित्वात असलेली जातीयता भारताच्या नेफा आघाडीवरील पराभवापेक्षा भयानक भासते.

मुंबईस रख्या पुढारलेल्या, कॉस्मॉपॉलिटन वगैरे वगरे शहरांत शेंकडा एक तरी आंतर–जातीय, आंतर–धर्मीय विवाह होतो काय ? फार काय, १९४५–५० या पांच वर्षांत मुंबईत झालेल्या एकूण विवाहांशीं आंतर–जातीय विवाहांचे जें प्रमाण होतें तेवढें तरी प्रमाण १९६०-६५ या पांच वर्षांत राखलें गेलें आहे काय ?

गेल्या काही पिढ्या उच्च विद्या विभूषित असलेल्या जातींतहि हीच स्थिति आढळते. मग अर्धमागास व मागास जाती जमातींत काय वेगळी स्थिति असणार ? सांस्कृतिक फरक वगैरे वगैरे मांडण्यांत येणाऱ्या सबबी केवळ बंडल आहेत. कमालीचे सांस्कृतिक साम्य असलेल्या निरनिराळ्या जातींतूनहि आंतर-जातीय विवाह होत नाहीत. अशी निरनिराळ्या जातीचीं कुटुंबे एकमेकांना त्यांच्या त्यांच्या जातीतील 'स्थळें' शोधण्यास मदतहि करतील; पण आपल्याच कुटुंबांत असलेले 'अनुरूप स्थळ' सुचविणार नाहीत. तें दोन्ही बाजूला मनांतहि यावयाचे नाही, हें खरें नाही का ?

लोकशाही, उदारमतवाद, समाजवाद वगैरे वगैरे विषयी कंठरवाने वाद घालणाऱ्यांतहि हीच गोष्ट दिसून येते. गोऱ्यांच्या मुलीला काळ्यांचाच मुलगा अन् देसायांच्या मुलाला देशमुखांचीच मुलगी लागते. अन् ही सगळी मंडळी बहुधा समाजवादी असते, साम्यवादी असतें, लोकशाहीवादी तर असतेच. साऱ्यांच्याच बाबतींत हें सारखेंच खरें असल्यामुळें, 'तेरी भी चूप मेरी भी चूप' म्हणून सारेच गप्प राहतात ! आपल्या समाजांत खोलवर शिरलेल्या दंभाचे हें एक लक्षण आहे. यापासून आम्ही तुम्ही कुणीच मुक्त नाही. अन् हेंच खरें दुखणें आहे !

कांही वर्षांपूर्वी स्व. डॉ. आंबेडकरांनी आपल्या अगणित अनुयायांसह हिंदु धर्माचा जाहीर त्याग केला. वास्तविक ते हिंदूंच्या










**देशाचे संरक्षण झालेच पाहिजे**

**वीर मातेचा खरा सुपुत्र**

**शास्त्रीजी पंतप्रधान झाले तेव्हां त्यांच्या वृद्ध मातोश्री म्हणाल्या होत्या, "माझें लालबहाद्दुरला एवढेंच सांगणें आहे की, प्राण गेला तरी बेहेत्तर, पण देशाचे संरक्षण झालेच पाहिजे. गरिबांचे नुकसान होईल असें त्यानें कांहींच करतां कामा नये"**

**आणि शास्त्रीजींनीं कृतीनें आपण 'सुपुत्र' आहोंत हें सिद्ध केले.**

जातीबंधनावरती, जातीय उच्च नीचतेवरती—नव्हे त्यांच्या तोंडावरती थुंकले. पण हिंदु समजल्या जाणाऱ्या समाजांत जराहि खळवळ झाली नाही. पेल्यातील वादळ झालें नाही. काही विचारहि सामाजिक पातळीवर झाला नाही. जातीय विचार करण्याचे लोकांनी सोडलें हें याचे कारण नसून जे गेले ते आमचे कुणीच लागत नव्हते हें त्याचें कारण आहे. आपली एकता ही इतकी भक्कम !

मुंबईतील 'वर्गजागृत' कामगार वर्गातहि इतकीच शोचनीय स्थिति आढळते. या शहरांत गेलीं कित्येक वर्षे कामगारांची 'वर्गीय' चळवळ चालू आहे, परंतु तेथेंहि वर्षाकांठी तीनहि आंतर—जातीय विवाह तेथें होत नसावेत ! आणि कोणताहि राजकीय पक्ष त्यावद्दल एक शब्द बोलावयास तयार नसतो ! म्हणजे महान् मार्क्स मुर्नीदेखील येथें ढळढळा रडला ! !

## आपलीच वास्तव जबाबदारी

अर्थात् येथे हें लक्षात ठेवले पाहिजे की, आपणा सर्वांचेच वाडवडील याला जबाबदार आहेत; याच्या श्रेयापश्रेयाची वाटणी अप्रस्तुत आहे. कारण नीट ओळख पटूनहि तोच वारसा आपण चालवीत आहोंत. आम्ही तुम्ही या संबंधांत काय करतों हेंच महत्त्वाचें आहे. आज प्रजासत्ताक भारतांत रहाणाऱ्या नवयुगांत प्रवेश करणाऱ्या भारतीय नागरीकांची ही वास्तव जबाबदारी आहे. ही वाडवडिलाजित 'इस्टेट' आपण पुढील पिढयांच्या हातीं सुपूर्द करणार का ती नष्ट करणार असा हा प्रश्न आहे.

राजकीय पक्ष नि पुढारी या बाबतींत मोलाचें कार्य करूं शकतील यांत शंका नाही. परंतु या संबंधातली अंतिम जबावदारी प्रजेवरच निर्भर आहे. कारण प्रजासत्ताकाच्या यशापयशाची अंतिम जबावदारी पक्षांवर किंवा पुढाऱ्यांवर नसून ती प्रजेवरच आहे हें लक्षांत ठेवावयास पाहिजे.

प्रजासत्ताक भारतांत, हिंदू कायदा, मुसलमान कायदा, वगैरे निरनिराळे कायदे, अल्पसंख्य, बहुसंख्य, वगैरे वगैरे प्रकार लाजिरवाणे आहेत. कालविसंगत व रोगट रूढीच उपद्रवी अवशेष आहेत. त्यांचे उच्चाटण व्हायलाच पाहिजे. ज्याप्रमाणे भारतीय फौजा आक्रमकांचा समाचार घेण्यासाठी जवानांना सरहद्दीपलीकडे धाडण्याचा विद्युत: निर्णय घेण्यांत आला त्याचप्रमाणे शासनानें सर्व देशभर एकच एक नागरीक संहिता लेखणीच्या एका फटकाऱ्यानिशीं अंमलांत आणावी. यांत अडचणी नाहीत असें नाही. परंतु अडचणींचा बाऊ करणारांना बर्की गांठता येत नाही; फक्त षंढ तत्त्वज्ञानें प्रसवता येतात ! अशा निर्णयाला विरोध करण्यासाठीं दक्षिणेंत हिंदी विरोधी आंदोलनांत स्वत:ला जाळून घेणाऱ्याप्रमाणे स्वत:ला जाळून घेण्यासाठी काहीं महाभाग ठिकठिकाणी तयार होतीलहि. अशांना पेट्रोलचा मोफत पुरवठा करावा असें मी नम्रपणे सुचवीन !

अर्थात् कायद्याला वगल देऊनहि जाति संस्था शिल्लक राहतीलच. तेवढी ती चीवट जरुर आहे. म्हणून शासनाने आणि सामाजिक संस्थांनी आंतरजातीय विवाहास सक्रीय मदत करावी. आंतरजातीय विवाह करणारांस शेती—वागायतीची सारामाफी देणे, नोकरीसाठी अग्रक्रम देणे, धंद्यात सवलती देणे, रहाण्याच्या जागांसाठी अग्रक्रम देणे, रोख रक्कम देणे वगैरे गोष्टी जरुर कराव्यात. ही लांच नव्हे; हें पारितोषिक होय. स्वातंत्र्य लढयांत भाग घेणारांस सवलती देणें हें जसें रास्त तसेंच जातीय गुलामगिरीशी लढा देणारांना सवलती देणें रास्तच होय.

## ना. यशवंतरावजींना साद

भारतीय सेना सीमा पार धाडण्याचा ऐतिहासिक निर्णय घेण्यात ना. यशवंतरावजींचा हात होता. ते मराठी जनतेचे नेते आहेत. मराठी समाजाच्या सर्व थरांत त्यांच्या शब्दाला मान आहे. त्यांनी वरील प्रकारच्या सामाजिक परिवर्तनास गतिशील प्रेरणा द्यावी. व निदान महाराष्ट्रांत तरी एक नागरीकत्व—आजच्या प्रमाणे नव्हे तर खरेखुरें भारतीय नागरीकत्व प्रस्थापित करावें व इतर राज्यापुढे आदर्श ठेवावा. कारण सामाजिक परिवर्तनात गति इतकें अन्य कशालाहि महत्त्व नाही. तसें झाले तरच आपण पांच सप्टेंबरला घेतलेल्या निर्णयाला शोभणारे नागरीक ठरूं. आणि हजारों वर्षाच्या या मानवतेच्या शत्रूवर निर्णायक विजय मिळवूं ! ●●●

**माझा 'लाल' जाईलच कसा ?**

**'देशाचे संरक्षण झालेच पाहिजे' ही मातेची आज्ञा कसोशीने पालन करणारे लालबहाद्दुर ताश्कंद येथे मृत्यु पावले ही वार्ता त्यांच्या वृद्ध मातोश्री रामदुलारी देवींना (वय ९२) जेव्हां कळविण्यात आली तेव्हां त्यांचा तीवर विश्वासच बसला नाही ! 'देशाचें संरक्षण' अजून पूर्णपणें झालें नसल्यानें बहुधा "माझा लाल असा जाईलच कसा?" असं त्या म्हणाल्या असाव्या. शास्त्रींचा मृत देह १० जनपथावर पोहचतांच त्यांची खात्री पटली.**

**मातेचा आज्ञाधारक सुपुत्र देवाजेने तिच्यापासून हिरावून नेला गेला होता.**







अनुक्रमणिका

## अहो, हे तर दीपस्तंभ !!

**मृत्यु** मोकाट सुटला आहे. संक्रांत आली आहे. ही संक्रांत मोठ्या माणसांचे बळी घेत, थैमान घालीत संचार करते आहे. ह्या थैमानाला कांहीं ताळतंत्र राहिलेले दिसत नाही. असल्याचा नसला होतो. ताठ उभा राहिलेला कणा पिचतो. बोलणारा मूक होतो. चालणारा कोलमडतो. गात्रा गात्रांतले चैतन्य क्षणांत अचेतन होते. असंख्यांची प्रेरणा गलितगात्र होते. स्फूर्तिस्थानें 'शांत' होतात. आज खरोखरच मृत्यु मोकाट सुटला आहे. थैमान घालतो आहे. माणसें टिपतो आहे. मोठी माणसे ! कलेतली मोठी माणसे ! साहित्यातली मोठी माणसे ! राजकारणातली मोठी माणसे ! मोठे तपस्वी आणि मोठे सेवक—आज 'साऱ्यांना झोडपीत तो मोकाट सुटला आहे. त्याला देश कळत नाही, प्रांत कळत नाही. जात कळत नाही. वय कळत नाही. तो 'फू:' करतो आणि चांगली चांगली कर्तबगार, गुणी माणसे जगाच्या पटावरून उडून जातात—आज खरोखर मृत्यु मोकाट सुटला आहे. सावधान ! !



एवढ्यांतल्या एवढ्यांत त्यानें किती तरी मोठी माणसे टिपली पहा ! **गणपतराव बोडसांना** तो एक दिवस अलगद घेऊन गेला. वय झालं होतं हें कदाचित् खरंही असेल. पण माणसें झोडपण्याच्या ह्या कार्यक्रमात कशी गति आहे ती पहा ना ! **गणपतराव बोडस** म्हणजे मराठी रंगभूमीचा गेल्या साठ वर्षांचा चालता बोलता इतिहास होता. नटवर्य हें बिरुद आतां गुळगुळीत झाले आहे. गल्लीबोळातही आतां नटवर्य 'होऊं' लागले आहेत. नटवर्य होणे आणि नटवर्य असणे यांत फरक आहे. तो फरक ज्यांनी खरेखुरे (जाहिरातीचे नव्हेत) नटवर्य पाहिले आहेत त्यांच्याच ध्यानीं येईल. गणपतराव बोडस ह्यांच्या भूमिका ज्यांनी पाहिल्या असतील त्यांना ते **सर्वार्थानें नटवर्य** होते हे म्हणणे मान्य होईल. नट हा केवळ विनोदी, करुण, ऐतिहासिक असा असत नाही. साऱ्या जीवनाचा तो सामग्र्याने विचार करतो. तो त्या त्या भूमिकांच्या रूपाने एक जीवनाचे संपूर्ण चित्र साकार करीत असतो. साऱ्या जीवनाचे व जीवनाचाच आविष्कार करण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या रंगभूमीचे—कलेचे ते आव्हान आहे असे तो मानतो—आणि तीं आव्हाने स्वीकारून कलेची साधना करीत असतो. गणपतराव बोडस ह्यांनी कलेची जी साधना केली ती हें आव्हान स्वीकारून ! त्यामुळेच गंधर्व नाटक मंडळीत त्यांनी 'सुधाकर'ही रंगविला आणि 'कृष्ण'ही ! लक्ष्मीधरालाही त्यांनीं 'कलेचा स्पर्श' दिला आणि अमर केले. शकार, शिष्यवर ह्याच कारणाने त्यांनी गाजविला. ह्या साऱ्या भूमिकांचा ज्यांनी अभ्यास केला आहे त्यांना त्यांची 'प्रकृति' किती वेगळी आहे हें ध्यानांत येईल. सुदैवाने गणपतरावांच्या ह्या साऱ्या भूमिका मी पाहिल्या आहेत. त्यांचा ऐन वैभव काळांतला' फाल्गुनराव'ही मी पाहिला आहे आणि सत्तरीच्या घरांत गेल्यानंतरचा 'फाल्गुनराव'ही मी पाहिला आहे. आकाशवाणीच्या नाट्य दर्शनाच्या कार्यक्रमांत त्यांनी सादर केलेली त्यांची 'झलक'ही मला स्मरते. व्यक्तित्वावर कला कधीं मात करते. उणीवा भरून निघतात. गणपतराव हे कांहीं देखणे नव्हते. त्यांचा आवाज पल्लेदार नव्हता. संगीत नाटकांच्या जमान्यांत ते 'हीरो' म्हणून वावरले. पण असामान्य गायकीचे वरदानही त्यांना कधी लाभले नव्हते. पण तरीही गणपतरावांनी 'इतिहास' घडविला. त्यांच्या अभिनयाने, बोलक्या डोळ्यांनी, हलत्या मुद्रेने आणि वाक्यांच्या उच्चारणाने एक नवा इतिहास घडविला. शकाराची प्रकृती आणि सुधाकराची प्रकृती भिन्न असेल पण गणपतरावातल्या 'नटा'ची प्रकृती मात्र अखेरपर्यंत एकच होती. ती कलारत होती. प्रामाणिक होती. तिला 'भूमिकेची प्रकृति' समजण्याइतकी झेंप होती' **कांचन भट** पाहतांना नाटकाचा विसर पडे आणि लक्ष्मीधर पाहतांना शिष्यवर तोच का हा कांचनभट ? फाल्गुनराव ? असा संभ्रम उत्पन्न होई ! गणपतराव बोडस आणि बालगंधर्व यांनी रंगभूमीच्या वैभवकालांतली अनेक सुवर्णपानें लिहिली आहेत. केवळ 'अभिनयाची उंची' होती म्हणूनच बोडस—गंधर्व युतीने हे वैभव उपभोगिले. बोडस हे व्यवहारी होते म्हणूनच गंधर्व नाटक मंडळी कांहीं मोठे, वैभवाचे, असामान्य रेखाटून जाऊं शकली. पुढे त्यांचे जमले नाहीं. ते निवृत्त झाले. पण 'नाट्य निष्ठा' सुटली नाही. 'माझी भूमिका' हें मराठीतले पहिले नटाचे आत्मचरित्र ! त्यानें खूप खळबळ उडवून दिली. बोडसांना शत्रूही झाले. पण गणपतराव बोडसांच्या कलेबद्दल मात्र त्या शत्रूंचेही दुमत नाही. त्यांच्या मृत्यूमुळे जुन्या, वैभवशाली रंगभूमीचा एक थोर शिल्पकार मृत्यूनें टिपला आहे. ★★

विश्वसाहित्याच्या रंगभूमीवरचा असाच एक थोर नाटककार, कथालेखक, कादंबरीकार, पटकथालेखक, मर्मज्ञ साहित्यटीकाकार **सॉमरसेट मॉम** ह्यालाही मृत्यूने गिळले आहे. सॉमरसेट मॉम हेही एक वयाने पिकलेले, पण कलेने सतत टवटवीत






असलेले असे एक सुवर्णपान होते असे म्हटले पाहिजे. कला वा साहित्य देश–भाषांची बंधने मानीत नाहीं हें जर खरें–असेल तर मॉमच्याबाबत तें सिद्ध झाले आहे. मॉम हा जगाचा **'स्टोरी टेलर'** होता असेंच म्हणतां येईल. जगांतला **श्रीमंत लेखक** म्हणून मॉम प्रसिद्ध होता. पण ही श्रीमंती गुणांचीही होती असें म्हणतां येईल. मॉमची वाङ्मयीन कारकीर्द ही वयाने मोठी होती. सतत साठ वर्षे मॉमने लेखणी चालविली. खुद्द त्याच्या देशांत त्याला 'धंदेवाईक वा सिनिक्' ह्या नांवाने संबोधले जात होते तरी जगाने मात्र मॉमचा सतत गौरवच केला. लोकप्रिय कथालेखक म्हणून त्याला मानले. मॉमच्या यशाचें मर्म त्याच्या अविश्रांत प्रवासांत, परिश्रमांत आणि सूक्ष्म निरीक्षणांत होते. तो स्वतःच आपल्या Summing up ह्या पुस्तकांत म्हणतो. "I am almost inclined to say I could not spend an hour in any one's Company without getting material to write at least a treadable story about him — I have taken living people and put them into the situations, tragic or comic, that their characters suggested. I might well say that they invented their own stories. I have been incapable of those great, sustained flights that carry the author, on broad pinions into a celestial sphere. My fancy, never very strong, has been hampered by the sense of probability. I have painted casel pictures not frescoes.

मॉम हा उत्तम कलाकार होता. जीवन पाहण्याची, त्यांतलें सौंदर्य टिपून घेण्याची व त्याला कलात्मक सौंदर्याचा स्पर्श देऊन ते सोने सादर करण्याची किमया मॉमला साधली होती. हें करतांना एक प्रकारची कलात्मक अलिप्तता त्याला साधली होती. अनुभवांना 'नकार' देण्याची वृत्ती त्याच्याजवळ नव्हती. गूढवाद आणि तत्वज्ञान ह्याचा स्पर्श त्याच्या उत्तर आयुष्यांतील लेखनात झाल्याचे जाणवते. त्यांच्या लेखनाने मानवी मनाचा फार मोठा पट (span) उभा केला आहे. त्यांनी ३६ पुस्तकें, २६ नाटकें व सव्वाशेच्यावर कथा लिहिल्या. १९४८ साली त्यांनी नाटकें लिहिणें बंद केले. कारण he found the farm out worn आणि कथालेखन बंद केले कारण he was getting old! ! रेडियो आणि टेलिव्हिजनला तर मॉम नसते तर आपलें 'दुकान' बंद करावे लागले असते. त्यांच्या पांच कादंबऱ्यावर चित्रपट निघाले,

Rain, of Human Bondage, (Twice) the moon & six pense. Painted veil आणि the Razor's Edge ह्या त्या भाग्यवान कादंबऱ्या! वयाच्या ७५ व्या वर्षी मॉम स्वतःच एक चित्रपटांतल्या आपल्या व्यक्तिरेखांचा परिचय करून देण्यासाठीं चंदेरी दुनियेंत आले. चित्राचे नांव होते Quarte! ! हाच प्रयोग त्यांनीं Trio ह्या चित्रातही केला. Rain हे त्याचे गाजलेले नाटक– यशस्वी झालेले नाटक त्यांनीं स्वतः लिहिले नाहीं. त्यांच्या गोष्टीच्या आधारें तें नाटक जॉन कोल्टन आणि क्लेमेन्स रॅण्डॉल्फ यांनी लिहिले. त्या नाटकानें १००,००० पौंड मिळवून दिले. व मॉमला जगप्रवासाची सोय उपलब्ध करून दिली. of Human Bondage ह्या कादंबरीनें कादंबरीच्या जगांत एक वेगळा इतिहास घडविला आहे.

१८७४ च्या जानेवारींत मॉमचा जन्म झाला. वयाच्या आठव्या वर्षी आई व दहाव्या वर्षी वडील वारल्याने तो पोरका झाला. तेवीसाव्या वर्षी त्याने MRCS व L R C P ह्या डॉक्टरीच्या पदव्या मिळविल्या. पण त्याने डॉक्टरी कधीं केलीच नाही. लेखनच प्रधान मानले ? 'लिझा ऑफ लम्बेथ' ह्या पहिल्याच कादंबरीच्या यशाने मॉमना हा विश्वास मिळवून दिला. १९१७ साली मॉमना ब्रिटिश सरकारने हेरगिरीच्या कामावर नियुक्त केले. त्यासाठी त्यांना पैसाही दिला. आणि बोल्शेव्हिक क्रांती थांबविण्याचे कामगिरीवर पेट्रोग्राडला पाठविले. कल्पना अशी की, लेखक ह्या नांवाने मॉमना हे जमेल. मॉम स्वतःच म्हणतात "They thought my being a writer was a good cover for my activity. I feel a deep sense of failure — complete & utter failure — I was the wrong man for the job." दुसऱ्या महायुद्धांत मॉम हे पॅरिसला होते. माहिती खात्यांत ते (ब्रिटिशांच्या) नोकरीला होते. जर्मनांनी पॅरिस जिंकल्यावर १३०० ब्रिटिश निर्वासितांबरोबर मॉम लंडनला परत गेले. त्या युद्धांत त्यांच्या संग्रहांतल्या दुर्मिळ कलातिकृ नाहींशा झाल्या. दक्षिण फ्रान्समध्ये त्यांचा जो बंगला होता तो लुटला गेला. युद्धानंतर ते परत गेले आणि मग कांहीं वर्षांनीं ते स्थायिक झाले. १९६२ मध्ये त्यांनी आपला चित्रसंग्रह£ ५२३०००ला विकला. त्यांतल्या **पिकासो**च्या चित्रांची किंमत £ ८०,००० एवढी आली, **ॲलन सर्ल** ह्या आपल्या सेक्रेटरीला त्याने मुलगा म्हणून स्वीकारले त्यामुळे त्यांच्या मुलीशीं भांडण झाले. १९६४ मध्ये २,८०,००० डॉलर्स मुलीला देऊन मॉमने तो तंटा मिटविला. ३४ वर्षे ॲलन सर्लनें मॉमची नोकरी केली व त्यांतून निर्माण झालेल्या आपुलकीने मॉमने त्याला पुत्र म्हणून स्वीकारले व आपले सारे "भाग्य" त्याला बहाल केले. मॉम संपन्न व अनुभवसंपन्न जीवन जगले. व तृप्तपणे मृत्यूला सामोरे गेले. जागतिक वाङ्मयाच्या इतिहासाला सॉमरसेट मॉम हें नांव सार्थ गौरवानेंच घ्यावे लागेल.

★★

मृत्यूने झडपलेल्या महापुरुषांत भारताचे माजी सरसेनापति **कोडेंडेरा एस. थिमय्या**, भारताचे संस्थानी खात्याचे माजी सेक्रेटरी श्री. **व्ही. पी. मेनन**, सुप्रसिद्ध चित्रपट निर्माते–दिग्दर्शक **बिमल रॉय**, संगीत दिग्दर्शक **लच्छीराम**, सुप्रसिद्ध साहित्यिक व महाराष्ट्राचे थोर नेते **काकासाहेब गाडगीळ** व भारताचे **बहादुर 'लाल' शास्त्री** ह्यांचा समावेश

होतो. ह्यापैकी प्रत्येक माणसाने ह्या देशाला एक 'मोठा इतिहास' दिला आहे. काकासाहेब गाडगीळ व लाल-बहादूर शास्त्री यांच्या कार्याचा गौरव स्वतंत्रपणे 'दीपावली' करीत आहेच. पण ज. थिमय्या इत्यादि वर निर्देशिलेल्या महापुरुषांची आपापल्या क्षेत्रांतली कामगिरीहि गौरवास्पद अशीच आहे. स्वातंत्र्योत्तर कालांतल्या पहिल्या काश्मीर स्वारीच्या वेळी थिमय्या यांनी ११००० फुटावर रणगाडे नेण्याचा व पाक हल्लेखोरांना हतप्रभ करण्याचा जागतिक विक्रम केला होता. थिमय्यांना सायप्रसमध्ये कार्यरत असतांना मृत्यु आला. सैनिकाच्या समरांगणांतल्या मृत्यूने शान वाढते. थिमय्या तसे वारले. थिमय्या-मेनन, थिमय्या-नेहरू वादाने मध्यंतरी ते खूप गाजले. पण सेनापति म्हणून त्यांचे कर्तृत्व वादातीतच होते. त्यांच्या युद्ध-विषयक अनुभवांतली महत्त्वाची दोन सूत्रें खालीं मुद्दाम देत आहे–

1 "In a battle one must be prepared to suffer casualities. Not the one who sits back, but the one who ventures out boldly and takes risks is the true general."

2) Either you win or you lose; orthodox methods laid down in the training manuals do not pay dividends in actual warfare. Methods must be evolved to suit each particular situation.

व्ही पी. मेनन यांची कामगिरी शेकडों संस्थानांच्या विलिनीकरणाचे रूपाने नोंदविली गेली आहे. व्ही. पी. मेनन हे नॉन मॅट्रिक होते आणि तरीहि स्वयंकर्तृत्वाने त्यांनी स्वातंत्र्यपूर्व कालांत लिनलिथ्गो, वॅव्हेल व माऊंटबॅटन यांचे प्रमुख सल्लागार म्हणून स्थान मिळविले आणि नंतर भारताचे पहिले गृहमंत्री सरदार पटेल ह्यांचे सल्लागारपद त्यांनी भूषविले. शाळेंत प्रकृतीने जे नाकारले ते मेनन ह्यांनी पराक्रमाने मिळविले. त्यांची संस्थानविषयक कामगिरी भारताच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनी नोंदविली गेली आहे.

बिमल रॉय हे नांव केवळ एक चित्रपट निर्माते–दिग्दर्शक म्हणून परिचित नाही. तर एक ध्येयवादी, स्वयंप्रज्ञ, श्रेष्ठ असे निर्माते व कुशल दिग्दर्शक व उत्तम छायाचित्रकार म्हणून प्रसिद्ध आहे. 'न्यु थिएटर्स' हें एक ध्येयवादी चित्रांचे आद्यपीठ मानले जाते. त्यांच्या **'देवदास'**ने (सैगल, जमुना) अनेकांना त्या काळीं वेड लावले होते. त्याचे छायाचित्रण विमल रॉयनीं केले होते. त्यानंतर तेथेच ते छायालेखकाचे दिग्दर्शक झाले. तेथे त्यांनी **हमराही, अंजनगढ, पहला आदमी** हे चित्रपट दिग्दर्शित केले. नंतर मुंबईत त्यांनी बॉंबे टॉकीजसाठीं **'माँ'** हें चित्र दिग्दर्शित केले. त्यांच्या दिग्दर्शनाने गाजलेले चित्रपट **'परिणीता'** (अशोककुमार) मुन्नीचा **बाप बेटी** ! पुढें **बिमल रॉय प्रॉडक्शन्स**'ची त्यांनी स्थापना केली. आणि **'दो बिघा जमीन'** हे पहिलेच यशस्वी चित्र त्यांनी सादर केले. त्या चित्राने 'नवयुग' निर्मिले व **'बिमल रॉय'** हे चित्रसृष्टीचे प्रभावी आकर्षण ठरले. नंतरचे मधुमती, सुजाता, बंदिनी हे चित्रपट गाजले–पण लौकिक यश हे नेहमी व्यस्त ठरले आहे (निदान कलेबाबत तरी) बिमल रॉय यांच्या अपराधी कौन, देवदास, बिराज बहु, परिवार, परख, यहूदी, उसने कहा था, काबुली वाला, बेनजीर ह्या चित्रपटांना तें मिळालें नाहीं. पण न्यु थिएटर्सची परंपरा सांगणाऱ्या ह्या कलाकाराने 'बाजारा'शी तडजोड केली नाहीं. त्यांच्या गुणाचे चीज शासनाने केले. सुजाता, दो बिघा जमीन, बिराज बहु, मधुमती, परख, बंदिनी ह्या चित्रांना शासनाने बक्षिसे दिली. **दो बिघा जमीन**ला फ्रान्समध्ये पारितोषिक मिळाले. **बुद्ध** व **विवेकानंद** ह्या त्यांच्या अनुबोधपटांनाही परदेशांत कीर्ति प्राप्त झाली. विमलदांच्या मृत्यूने भारतीय चित्रसृष्टीला अतीव दुःख झाले.

मृत्यु मोकाट सुटला आहे. मोठी माणसे त्याने टिपली आहेत. पण मृत्यु मारू शकणार नाहीं असे मोठेपण ह्या 'मोठ्या' माणसांनी काल-पटावर नोंदविले आहे. त्या साऱ्यांच्या स्मृतीला आम्हीं अभिवादन करतो.

**–सारस्वत**

---

[पृष्ठ ५९ वरून – हैद्राबादची वारी]

साहित्यिकांचीच मिरासदारी दिसून येते. लहान मोठ्या सर्व लेखकांचा परिचय व्हावयास पाहिजे. यासाठी संमेलनाने कथा, कादंबरी, नाटक इत्यादि शाखांतील लेखकांची उपसंमेलने त्यावर्षीच्या उत्कृष्ट लिखाणाबद्दल भरवावीत व पुरस्कार देण्याची पद्धत सुरू करावी. राज्य सरकार पुरस्कार देते पण त्यात पुष्कळदा राजकारण (ही) येते (ह्या विषयी अनेक तक्रारी झाल्या आहेतच. काहींनी अशी बक्षिसे नाकारलीही आहेत.) तेव्हां संमेलनातर्फे असे पुरस्कार योजण्यात आल्यास सर्वास योग्य न्याय मिळेल. (अशी आशा) शिवाय संमेलनातर्फे पुरस्कार दिल्यास त्याला एक विशेष महत्त्व प्राप्त होईल.

संमेलनाने काही स्पर्धा आयोजित करणेही योग्य ठरेल. उदाहरणार्थ केशवसुतांची काव्य वैशिष्ट्यें (शताब्दीचे निमित्ताने) नाट्यनिकेतनची नाट्यसेवा, वा 'रांगणेकर (रौप्यमहोत्सव ध्यानीं घेऊन) मर्ढेकरांची कविता, 'आजची मराठी कादंबरी,' वगैरे विषयावर निबंध स्पर्धा आयोजित केल्यास व काही ठराविक निबंधाचे वाचन संमेलनात झाल्यास तो एक माहितीपूर्ण कार्यक्रम होऊ शकेल व सर्वांना त्यात भाग घेता येईल. यंदाच्या संमेलनात केशवसुतांच्या जन्मशताब्दि निमित्त त्यांच्या काव्याविषयी एकादी स्पर्धा ठेवली गेली असती तर ते उचित ठरले असते. (पण मुळांतच विस्मरण)

संमेलनांतील काव्य वाचन (किंवा गायन) हा एक महत्त्वपूर्ण कार्यक्रम असतो. त्यासाठी महाराष्ट्र व बाहेरील प्रांतातून कवींच्या प्रत्येकी दोन दोन कविता मागवाव्या व त्यातील निवडक कवितांचे काव्य वाचन (गायन) संमेलनात व्हावे म्हणजे आजच्या कितीतरी नवोदित (पण प्रत्यक्षांत अपरिचित) कवींना विशेष उत्साह प्राप्त होईल. व शिवाय अशा अनेक चांगल्या कवींची रसिकांना ओळख होईल. (श्रेय संमेलनाचे)

संमेलनांत ज्याप्रमाणे अधिकार ग्रहणाचा कार्यक्रम असतो त्याच प्रमाणे गतवर्षीच्या संमेलन विषयक कार्याचा, त्याच्या पूर्ति विषयक झालेल्या प्रयत्नांचा आढावा महामंडळाने घ्यावा. बोली भाषांचा शास्त्रोक्त अभ्यास, मराठीला मानाचे स्थान (मुंबई विद्यापीठात अद्यापही मराठीचा स्वतंत्र विभाग नाही), भिन्न भाषांतील साहित्याचे एकत्रीकरण ही जी अनेक कार्ये महामंडळापुढे आहेत ती डोळ्यासमोर ठेऊन संमेलनातील कार्यक्रम पत्रिका तयार व्हावयास हवी.

वारीच्या श्रद्धेने मी प्रतिवर्षी साहित्य संमेलनाला जातो. हैद्राबादलाही गेलो होतो. पण कधीं लिहिले नाही. यंदा लिहिले तेही वारकऱ्याच्याच श्रद्धेने ! काही तरी चांगले घडावे, नवीन घडावे, माझ्या मराठीच्या बोलाने 'कवतुक' अनुभवावे अशी ऊर्मि उरी दाटून येते म्हणून हा 'प्रपंच' केला आहे. उणे माझे ! चांगले, मोठे माझ्या माय मराठीचे !

वारी करीत राहणारच आहे. कधीं तरी पंढरीचा पांडुरंग भेटेल ह्या भावनेनं ! !

● ● ●




## शुभेच्छा !

स. न. वि. वि.

**विजयाचीही कमान चढती जी वैभवशाली ।**
**'सहासष्टही' साल चिंतितो व्हावें**
**विक्रमशाली ।।**

आ.

**मुंबई पण्डित महाजन**

## चूक भूल द्यावी घ्यावी

सप्रेम नमस्कार वि. वि.

आपण पाठविलेला अंक आणि लेखाच्या प्रति पोहोचल्या. आभार.

दीपावली-ऑक्टोबर १९६५ अंकामध्यें (काश्मीर-एक दृष्टिकोन) माझा परिचय देण्यामध्यें दोन अनाहूत विधाने झाली आहेत.

पहिले विधान म्हणजे मी आणि जनरल करिआप्पा एकाच वेळीं स्टॅंडर्स्टमध्यें होते हे खरे नाहीं. जनरल करिआप्पा ह्यांना माझे आधी २१ वर्षे म्हणजे १९१८ मध्येंच कमिशन मिळालें.

दुसरे जनरल करिआप्पा ह्यांचें शिक्षण स्टॅंडर्स्टमध्यें झाले नव्हते. त्यांचे शिक्षण हिंदुस्थानांतच पहिल्या महायुद्धाचे वेळीं इंदूर येथें १९१७ सालीं झाले.

ह्या विधानांची दुरुस्ती होईल अशी आशा आहे.

आपला,

**प्रभात रोड, पुणें ले. क. रा. ह. लिमये**

## संग्राह्य अंक

स. न. वि. वि.

ऑक्टोबर १९६५ चा अंक वाचला. आपला संपूर्ण अंक वाचनीय तर आहेच परंतु संग्रही ठेवण्यासारखा सुद्धां आहे. "काश्मीर" एक दृष्टिकोन हा ले. क. रा. ह. लिमये यांचा लेख अतिशय माहितीपूर्ण आहे. आपला संपादकीय लेख पुन्हां पुन्हां वाचावासा वाटतो. त्यांतील भाषेचा ओघ, शब्दांची फेक, धार आणि त्यांतील उपमा, उत्प्रेक्षा, अलंकार समर्पक आहेत. आपले सर्वच संपादकीय लेख उत्तम असतात. परंतु या अंकांतील लेख माझ्याच नव्हे तर मला वाटते दीपावलीच्या सर्वच वाचकांच्या दीर्घकाल लक्षांत राहील. "चाहूल" ही आनंद रेगे यांची कथा मनाची पकड घेते. कथा इतकी ओघवती आहे कीं, संपूर्ण कथा वाचल्याशिवाय अंक खाली ठेववत नाहीं. शास्त्रींचा परिचय मोजक्या शब्दांत आणि अगदीं सर्व गुणवैशिष्ठ्यांनीशी करून दिला आहे. आपले यापुढील अंक असेंच वहारदार आणि कला, संस्कृति व साहित्य गुणांनीं नटलेले निघावेत अशी इच्छा व अपेक्षा आहे. धन्यवाद !

आपला,

**मुंबई ४ परशुराम बारसकर**

## 'पत्रकार टॅबलो' फारच उत्तम

स. न. वि. वि.

यंदा प्रसिद्ध झालेल्या इतर कोणत्याहि दिवाळी अंकापेक्षां "दीपावली" उजवी आहे, श्रेष्ठ आहे यांत शंका नाहीं. त्याबद्दल आपलें विशेष अभिनंदन. तथापि आपल्या या अंकाच्या मुखपृष्ठानें मात्र नावीन्याचें समाधान दिले नाही. आंतील अभिनायिका, नायिका, शृंगार नायिका या चित्रांशीं तुलना करतां मुखपृष्ठ फिके वाटते, आणि किंचित् तोचतोचपणाहि जाणवतो.

अंकांतील साहित्य वरच्या दर्जाचे आहे यांत शंका नाहीं. श्री. पु. भा. भावे, अरविंद गोखले यांचे कथासाहित्य चांगले आहे हेहि मान्य. परंतु या लेखकांच्या नवीन वाचकाला जेवढी भुरळ हें साहित्य घालील तेवढें माझ्यासारख्या त्यांचें बरेंच साहित्य वाचलेल्या वाचकाला घालीत नाहीं. मला श्री. सुरेश वेंगुर्लेकर आशादायक वाटले. त्यांची कथा मला चांगली वाटली. परंतु सुरुवातीचा अॅप्रोच वातावरणाला सुसंगत नाहीं हा ठळक दोष.

श्री. पु. ल. देशपांडे यांचा 'ही घरें ती घरें' हा लेख त्यांच्या कीर्तीला साजेसा असला तरी मध्यानंतर त्यांची लेखावरची पकड ढिली वाटते. श्री. राजाराम हुमणे यांच्या विनोदांत 'ओढून ताणून' पणा फार आहे.

श्री. काकासाहेब गाडगीळ व कांत यांचे लेख मला फारच चांगले वाटले. विशेषतः कांत यांचा लेख.

कविता ठीक आहेत. परंतु प्रामाणिकपणाने सांगायचे तर मला चित्र्यांच्या 'पॅरिसच्या पंखांतले' अक्षरहि कळले नाही. हा बहुधा दोष माझाच असावा.

"परदेशांत मला भेटलेली अविस्मरणीय स्त्री" ही लेखमाला सर्वोत्तम जास्त आवडली. सर्वोत्तम वाटलेले लेख श्री. अच्युत बर्वे यांचा 'योजनगंधा' आणि श्री. रमेश मंत्री यांचा 'बर्नीए श्रेयमी' हे.

आपण स्वतः काढलेली व्यंगचित्रे (विशेषतः राजकीय) आपल्या कीर्तीला साजेशीच आहेत. 'पत्रकार टॅबलो' फारच उत्तम आहे. विशेषतः 'मराठा गडी यशाचा धनी', 'जिवाची मुंबई', 'असा संपादक पृथ्वीतलावर झाला नाहीं,' 'रविवारची चिंतनिका' आणि सर्वोत्कृष्ट 'कायमचें प्रश्नचिन्ह ?' श्री. दत्ता गांगनाईक ह्या व्यंगचित्रकाराबद्दल अपेक्षा उंचावल्या आहेत. सुधीर या चित्रकारानें काढलेले प्रकाशवंदी—व्यंगमालेतील "भोंग्याचा आवाज झाला की, सर्वांनीं कॉटवरती यावयाचे" हे व्यंगचित्र फारच छान—त्यांचें विशेष अभिनंदन.

इतर बाबतींतील लक्षांत राहणारी कथा वामन चोरघड्यांची 'ख्याल.' श्री. देशपांड्यांची 'चंद्र' हीहि कथा चांगली वाटली. श्री. जितेंद्र अभिषेकी, भोबे ठीक आहेत.

आपला,

**अशोक पेंढारकर**

